सूटकेसवर ठेवले व ती निघून गेली. श्रीनिवासची कॉफी पिण्याची गति त्याबरोबर आपोआपच वाढली. मुकाटयाने केलेला तो हुकूमच आहे असें त्याला न कळत वाटलें की काय कोण जाणे !

स्नानें आटोपून दोघे खोलींत येतात तों मध्यभागीं दोघांचीं अंथरुणें घालून ठेवलेलीं व उदाचा मंद धूप खोलींत कोपऱ्यांतून फिरवीत असलेली ती त्यांना दिसली.

" आता आडवे व्हा थोडे. होईल मग भोजन इच्छया. "

तिने चटकन प्रकाश मंद केला. दोघांनीही अगदी आवडीने आभारपूर्वक बिछान्यावर अंग टाकलें. श्रीनिवासने सीलिंगवर डोळे रोखले. विनायकाने तपकिरीची चिमूट घेतली.

" इश्श, हा काय नवीन घाणेरडा प्रकार ?" तिने त्याला छेडलें.

" अग घाणेरडी असली तरी ही माझी प्रेयसी आहे. "

" चल, चावट कुठला. " एक हलूच चापट मारून त्याच्या हातांतून तिने ती डबी घेतली व टेबलावर ठेवली.

" हें ग काय ? "

" पहातेय, तुला तुझ्या प्रेयसीचा वियोग किती वेळ सहन होतोय तो ? " हसत हसत ती गेली.

दीडदोन तासांनी ती जेवायला बोलवायला आली तों विनायक गाढ झोपेंत निजलेला व श्रीनिवास गुंगींत कण्हत असल्याचें तिला आढळून आलें. विनायकला तिने चटकन उठवलें व त्याच्या हातीं थर्मामिटर दिलें. ताप घेतांना श्रीनिवास जागा झाला. थर्मामिटरकडे तो आश्चर्याने पाहूं लागला. ताप १०४·६° होता. विनायक घाबरला. तिने थर्मामिटर पाहून त्याला बाजूला केलें. शेजारच्या कपाटांतून जेनॅस्पिरिनची एक गोळी काढून

श्रीनिवासला दिली व झटकन एक चिठ्ठी देऊन विनायकला डॉक्टरकडे जायला सांगितलें. हातांत पैसे देऊन येतांना ताजी ब्रेड आणायला बजावलें. तो गेल्यावर थंड पाण्याने थबथबलेला नॅपकिन श्रीनिवासच्या डोक्यावर ठेऊन ती जवळ बसली. अर्धातास ती एकसारखी ओली घडी ठेवीत होती. शेवटीं श्रीनिवासने डोळे उघडले.

"आता जरा बरं वाटतंय ना?" मृदु स्वरांत तिने विचारलें.

"हो."

"निजा तर आणखी थोडे. दादा गेलाय डॉक्टरकडे."

पांच मिनिटें स्तब्धता होती.

"तुम्ही किती त्रास घेतां आहांत" त्याने थकलेल्या स्वरांत म्हटलें.

"तुम्हांला आई आहेना?" उत्तरादाखल तिने प्रश्न केला

दोन मिनिटें शांत होतें.

"मला आई आहे हें तुम्हाला कसें कळलें?"

"दादाने केव्हा तरी तुमची त्रोटक माहिती एका पत्रांत दिली होती कायशी. आईची आठवण होत असेल नाही?"

तो कांही बोलला नाही. नुसतें तिच्याकडे त्याने पाहिलें. एकाद्या लहान बालकासारखा निर्व्याज चेहेरा होता तिचा.

आणखी दोन मिनिटें शांत होतें.

"आई तुमची वाट पहात असेल नाही?" प्रश्न सहज विचारलेला होता. तरी तो ऐकतांच श्रीनिवास मनांत विलक्षण शरमला. त्याने डोळे मिटून घेतले. तिने मुकाट्याने घडी बदलली. तिच्या डोळ्याच्या कडा उगीचच ओल्या झाल्या. त्याला घाम येऊं लागलेला पाहून तिने हलक्या हाताने छाती व मान पुसली. ती घाम पुशीत असतांना मात्र त्याला आईच्या स्पर्शाची आठवण झाली व नकळत आलेला हुंदका त्याने कसा तरी दाबला. तिने

त्याला थर्मामिटर लावायला दिलें. ताप १०१ पर्यंत उतरला होता. इतक्यांत डॉक्टर आले. तिने आतापर्यंत काय काय उपाय केले तें त्यांना सांगितलें. "अन् तापहि उतरला आहे १०१ पर्यंत." ती म्हणाली.

"उतरलाना! Thank God" विनायकाने चटकन म्हटलें. त्याच्या घाबरलेल्या मुद्रेकडे व कालिंदीच्या आत्मविश्वास-दर्शक चेहेऱ्याकडे श्रीनिवासने आलटून पालटून बघितलें. कृतज्ञतेने त्याचें हृदय भरून आलें.

डाक्टरांनी त्याला नीट तपासलें व ते म्हणाले "कांही विशेष नाही. फक्त मानसिक व शारीरिक श्रम झालेले दिसताहेत. म्हणूनच टेंपरेचर उतरायला हवंच होत. जेनॅस्पिरिन दिलंत तें उत्तम झालं. औषधाची गरज नाही. झोप लागली की उतरेल ताप. झोप आली नाही तर ही पुडी द्या म्हणजे झालं."

डॉक्टर गेले. कालिंदीने भोवतालचा पसारा आवरला.

"दादा तुमचे कपडे बदलील. मग निजा जरा. दादा, कपडे बदलून तूं ये, नी दोन घांस खाऊन घे–सकाळपासनं उपाशी आहेस." मृदु स्वरांत या सूचना देऊन ती घरांत गेली.

अर्ध्या तासाने ती व विनायक परत आले. विनायकाने थर्मामिटर लावलें. ताप ९८॥ पर्यंत उतरला आहेसें पाहून ती आंत गेली व पांचदहा मिनिटांनी गरम दूध व टोस्ट घेऊन आली. त्या जिनसांकडे पाहतांच श्रीनिवासला आधल्या दिवशीं ओतूं गेलेल्या दुधाची आठवण झाली नी मनांत काय वाटलें तें त्याचें त्यालाच समजेना. मात्र एवढासा देखील विरोध न करतां त्याने त्या घेतल्या.

"दादा, ती पुडी देच, म्हणजे झोप येऊन विश्रांति मिळेल. मी घरांतलं आवरून येतें."

ती जातांच श्रीनिवासला खातां खातां उगीचच हुरहूर वाटली.

—७—

पहाटेचा साडेपांच सहाचा अंदाज असेल, श्रीनिवास जागा झाला तो कुणाच्या तरी मधुर गाण्यामुळे. कान देऊन तो ऐकूं लागला.

" घनश्यामसुंदरा श्रीधरा, अरुणोदय झाला
उठि लवकर वनमाळी, उदयाचळीं मित्र आला । "

आपण एकटेच अहोंत या भावनेने मनुष्य जसें स्वतःशींच रंगून मनमोकळेपणाने गातो तसें कालिंदीचें गाणें होतें. प्रभात-कालीं निस्तब्ध नी पवित्र वातावरणांत गायलेलें तें गीत ऐकत असतांना श्रीनिवासला गहिवरून आलें. आपल्यालाच जणू उठायला सांगितलें आहे अशा समजुतीने तो एकदम उठून अंथरुणावर बसला. गीत संपलें तरी तो तसाच तंद्रींत बसला होता. विनायकाची दृष्टि मिस्किलपणे त्याच्यावर खिळली होती. हळूच दार उघडलें गेलें. श्रीनिवासच्या चेहेऱ्यावरची तरतरी पाहून कालिंदी म्हणाली,

" आता अगदी छान वाटतं ना ? "

" हो तर. पण तुम्हांला उगीच किती त्रास दिला. "

" अरे त्यांत काय आहे ? त्रास घेण्याचा स्वभावच आहे तिचा. " विनायकाने मधेच तोंड घातलें.

" कुंभकर्णाची झोप इतक्या लौकर कशामुळे उघडली ? "

" अग, त्या घनश्यामाला ऊठ म्हणून तूं आरोळी ठोकलीस ना, त्यामुळे. "

" चल, फाजील कुठला. उगीच गुणगुणत होतें थोडंसं तर त्याचं हें इतकं करतोयस झालं. "

" बरं असूं दे. पण आज अगदी ठाकठीक दिसतेस. कार्तिक-स्नान वगैरे सारखा नेमबीम धरला आहेस की काय ? "

" छे रे जरा पातळ बदललं झालं. सकाळीं धुतलेलं स्वच्छ अंगावर असलं की बरं वाटतं आपलं आपल्यालाच."

" अस्सं होय ! हेंच मला वाटतं तुझं तें Philosophic mind चं enjoyment ? आमच्या श्रीला होईल तें जास्त appreciate. "

" बरं बरं. पाहूं मग कुणाला काय वाटतं तें. अगोदर हें सांग की चहानंच तोंड धुणार आहेस की काय तें ? तुम्हांला इकडेच आणतें " श्रीकडे वळून ती म्हणाली.

" नको नको. मला अगदी छान वाटतंय. उगीचच तुम्हांला त्रास. "

" त्रास ? कां हो, आम्ही तुमच्या घरीं आजारी पडलों असतों तर तुम्ही काय आम्हांला हॉस्पिटलमधे पोचतं केलं असतंत होय ? "

" तसं कांही नाही. चल रे विनू तोंड धुवायला. " तो एकदम उठला.

" बऽरं. तेंही कांही वाईट नाही. " हेंही ती अगदी सहज बोलली. आजारीपणाचं आणखी कौतुक करून घेण्याची त्याची अस्पष्ट इच्छा तिथल्या तिथेच जिरली. त्याला एकदंम वाटलं, " अशी कशी ही अजब चीज ! धड जवळ नाही नी धड दूरही नाही. भोवतालचें जग कसें समतोल अवस्थेंत येतें हिच्या बोलण्यावागण्याने, अन् तेंही अगदी सहजासहजीं. तरीही तो थोडासा चिडलाच व हँडबॅग जवळ जाऊन ती उघडूं लागला.

" काय पाहतां आहांत ? " तिने शांतपणे विचारलें.

" कांही नाही. "

"टूथपेस्ट नी ब्रश पहात असाल तर मघाच न्हाणीघरांत नेऊन ठेवलाय."

"आता मात्र—" एवढेंच-मनांतल्या मनांत म्हणत असतां-नाच त्याच्या हातून बॅगचें झांकण धपकन खाली पडलें.

"अजूनही थकवा दिसतोय. थांबा हं मी इकडेच आणतें."

"नको नको," म्हणत श्रीनिवास तेथून घाईने गेला. विनायकही पाठोपाठ होताच.

स्वैंपाकघराजवळच्या लहानशा खोलींत ४-५ माणसांना पुरेल अशा एका साध्या टेबलाभोवती चार अगदी साध्या खुर्च्या होत्या. टेबलावर निर्मळ मेणकापड होतं. टेबलावर मध्यभागीं पितळेचीच, पण पहाणाराचें तोंड दिसेल, इतकी स्वच्छ अशी लहानशी फुलदाणी होती. तींत पुष्कळशा पत्रींत उठावदार दिसेल असें एकच पांढऱ्या गुलाबाचें मोठे फूल होतें. बाजूच्या मेजावर शेगडी; तीवर आधणाचं पाणी, बाजूला कपबशा वगैरे चहाचें सामान.

दहा एक मिनिटें वाट पाहून तिने किटलींत चहा घातला. इतक्यांत विनायक हजर झाला. "ए पोरी, झकास बनव चहा. आमचा श्री चहाच्या बाबतींत फार चोखंदळ आहे बरं कां!"

"अस्सं होय? येऊं देत तर खरी अगोदर–मग पाहूं." आणखी पांच मिनिटें गेल्यावर ती म्हणाली "तूं घे बरं चहा. थंड नी कडू होईल उगीच."

"पण येऊं दे ना त्याला."

"माझं ऐक. तूं घ्यायला लाग आपला." मिस्किलपणाने हसत तिनें त्याच्यापुढे कप केला. बोलत बोलत त्याने तो रिकामा केला. तरीही श्री आला नाही. शेवटीं तेथूनच त्याला त्याने हाका

मारल्या. तिने मुकाटयाने त्याचा कप पुनः भरला. तो रिकामा झाला इतक्यांत श्रीनिवास आला. रात्रीच्या झोपेमुळे त्याला आता हुशारी वाटत होती. त्यांतून त्याने आता नवीन शर्ट घातला होता. केस उलटे फिरवले होते. स्वच्छ धोतराचा सोगा हातांत घेऊन तो आंत आला नी खुर्चीवर बसला.

" अरे, किती हा वेळ ! इकडे तर एक हप्ता होऊन गेला. आता पी काढा. "

" I am sorry " कालिंदीकडे पहात श्रीनिवास म्हणाला. तिचा गंभीर चेहरा त्याच्या सौजन्यानें किंचित हसरा झाला. ती चटकन बाजूच्या टेबलाजवळ गेली. तेथे उभी राहून कांही तरी करीत होती. शरीराचा भार एका पायावर देऊन दुसऱ्या पायाचा आंगठा नाजूकपणे जमिनीवर फिरवीत ती उभी होती. सूर्याचीं कोवळीं किरणें तिच्या तोंडावर पडलीं होतीं. अगदी साधें गिरणीचें पातळ ती नेसली होती. तिचे कामसू हात टेबलावरील जिनसा जिनसांवर सफाईने फिरत होते. बोटांची हालचाल नी विशेष म्हणजे काम करीत असतांनाची तन्मय वृत्ति—श्रीनिवास सगळें सगळें पाहत होता. " घरकाम करीत असतांनाच स्त्रियांचं खरं सौंदर्य प्रगट होत असतं " असें एका कवीचें म्हणणें त्याला आठवलें. समोर कप येऊन पडतांच तो तंद्रींतून जागा झाला.

" हें काय दिलंस त्याला ? ओव्हल्टिन ? " आता कुठे वर मान करून विनायकाने विचारलें.

" कालपासून पोटांत कांही नाही. जरा उत्साह वाटेल. "

" अग, पण हा चहाशोकी प्राणी— "

" मग ! हॉस्पिटलमधे जबरदस्तीने दिलं की घेतां. तेंच

घरच्या माणसांनी जरा धोरण ठेऊन कांही केलं की तुम्ही लोक असे उसळतां की "—

" त्याच्या आईने मात्र या वेळीं त्याचा आवडता चहाच पुढे केला असता समजलीस !"

" हो समजलें. पण आया केव्हाही चूक करीत नाहीतच की काय ? "

नेहेमीपेक्षा जरा मोठ्याने हसत तिने ब्रेडला पातळसर लोणी लावलें नी प्लेट श्रीनिवासकडे सरकावून बालकाच्या लाडिक स्वरांत म्हणाली, " हें एवढं संपवायचं बरं कां ? "

उलट सुलट विकारांनी उसळणारें श्रीनिवासचें मन एकदम थंड झालें. तो मुकाट्याने खाऊं लागला.

" ए, बाई, ही तुझी जबरदस्ती पाहून तो आताच्या आता आईकडे चालता होईल. तेवढीच काय ती उभ्या जगांत त्याची प्रिय वस्तु आहे. "

खो-खो हसत विनायक उद्गारला.

" ते लाख जाऊं म्हणतील, पण आम्ही जाऊं दिलं पाहिजेना ? "

" ही पुन्हा जबरदस्ती. अग त्याला आईची आठवण होत असेल ! "

" साहजिक आहे. एरव्ही त्या ओढीनं जाणाराला कोण अडवील ? पण अशा तापकरी माणसाला जर जाऊं दिलं तर उद्या तीच आई म्हणेल की आम्ही काय माणसं आहोंत की जनावरं. पुरे झालं—आता खा हें. " असें निर्विकार चेहऱ्याने म्हणत तिने ब्रेडची दुसरी बशी त्याच्याकडे सरकवली नी स्वतःचा कप तिने ओठाला लावला. आईच्या पुनरुल्लेखानें श्रीनिवास इतका शरमला

की तिचें बोलणें संपतांच भान न राहून तो ओव्हल्टिन गटागट पिऊं लागला.

" अरे, अरे ! हें काय ! जरा Philosophic mind नी पी की. " विनायक एकदम ओरडला. त्यामुळे उसळलेल्या मनमोकळ्या हास्यांत कालिंदीही सहभागी झालेली पाहून श्रीनिवासला सर्व वातावरण कांही अवर्णनीय प्रसन्नतेने भरून गेलें आहे असें वाटलें. सर्व संकोच बाजूला सारून तो म्हणाला, " काय अक्का, एक अर्धा कप चहा देतां का ? " कालिंदीने एकदम वर पाहिलें नी कसलाही विचार न करतां त्याचा कप भरला.

" अग हें काय ? कपभर चहा ! वीष होईल त्याचं पोटांत !"

" होऊं दे. मी आहेना वीष झालं तर त्यावर उतारा द्यायला हजर. "

श्रीनिवास शेवटीं चहा प्याला तो अर्धा कपच.

बाकीच्या दोघांनी तें मुकाट्याने पाहिलें.

दोनचार मिनिटें स्तब्धतेंत गेलीं. इतक्यांत कोणी तरी आंत आलें.

" स्वैपाकी ठेवला आहेस वाटतं तूं ? " विनायकाने चौकशी केली.

" ठेवला होता. मध्यंतरीं सगळींच आजारी होतों. पण परवाच त्याला नको म्हणून सांगितलं. पगाराकरतां यायला सांगितलं होतं आज. "

" मग ठेवीनास कां आम्ही आहोंत-तोंवर ? "

" तुम्ही आहांत म्हणूनच तर ठेवायचा नाही " खुदकन हसून ती म्हणाली.

" तें कां ? "

"तें एक स्त्रीस्वभावांतलें रहस्य आहे." पटकन् बोलून तिने हसत हसत कपबशा आवरायला सुरवात केली. श्रीनिवास हतबुद्ध होऊन तिच्याकडे पहातच राहिला. पण कपबशा आवरणें म्हणजे चहाची बैठक संपल्याची नोटीसच असें समजून दोघेही उठून बाहेर गेले.

—८—

त्याच छोटया टेबलाजवळ दुपारीं दोघेजण जेवायला बसले असतां ऊन ऊन पातळ खिचडी, टोमॅटोचें सार, लिंबाचें जुनें लोणचें, तूप, नि पोळीचा पापुद्रा भिजत घातलेली साध्या वरणाच्या पाण्याने भरलेली वाटी, या जिनसांनी भरलेलें ताट श्रीनिवाससमोर नी साध्या सोज्वळ जिनसांनी भरलेलें दुसरें ताट जेव्हा विनायकासमोर आलें तेव्हा कुठे त्या दोघांच्याहि डोक्यांत त्या "स्त्रीस्वभावांतल्या रहस्याविषयी" प्रकाश पडला. खोलींतून ते दोघे टेबलाजवळ येऊन बसले ते वाद करीतच. वादाचा विषय म्हणजे फडके कादंबरी वाङ्मय. तो नेहमीचाच होता. आज जरा जास्त माजला होता. पण समोरील ताटाकडे पाहतांच एकदम थांबला.

"करा, ना सुरुवात." असें कालिंदीने म्हटल्यावर कुठे ते जेवूं लागले. अगदी मुकाटयाने.

"हें रे काय दादा ' बोलणं कां थांबवलंत ?"

"या तुझ्या पाहुण्यांना तुझा स्वैपाक जास्त पसंत आहे बोलण्यापेक्षा म्हणून."

"अन् तुला नाही वाटतं ? You are not merely eating-you are bolting dinner" श्रीनिवास म्हणाला.

"And you are attacking it." विनायकाने प्रत्युत्तर ठोकलें.

" पुरे हं स्तुति; साध्या गोष्टींची भरमसाट स्तुति करून स्त्रियांना खूष करण्याचा तुम्हा पुरुषांचा हा पिढीजात धंदा आहे." उगीचच गंभीर चेहेरा करून कालिंदी म्हणाली. पण लगेच टोमॅटोच्या साराने दोघांच्याहि वाटया तिने भरून टाकल्या.

" हं, चालूं द्या तुमचा फडके वाद. तुम्ही काय एम्. ए ला मराठी घेतलंत ? "

" हो. तुम्हांला कसं कळलं ? " श्रीनिवासने कुतूहलाने विचारलें

" असंच. ती आपली आम्हां बायकांची आंधळी तर्कशक्ति आहे. "

" अग ! ह्याने फडक्यांच्या कादंबऱ्या नुसत्या वाचल्या आहेत. मला त्या कादंबऱ्यांचं ज्ञान आहे " मधेच विनायक म्हणाला. त्यावर श्रीनिवास उसळला नी झाला पुन्हा वाद सुरू. जेवण संपवून ते खोलींत गेले तरी तो चालूच होता. काम आटोपून कालिंदी तेथे येऊन बसली व मुकाटयाने बराच वेळ नुसती ऐकत होती. शेवटीं त्या कादंबऱ्यांचें महत्वमापन सुरू झालें तेव्हा विनायक एकदम तिच्याकडे वळून म्हणाला, " अक्का ! तूं सांग काय तें ? हा मला नुसता नांगऱ्या समजतो. जसं कांही शेतकरी नी वाङ्मय यांची फारकत आहे."

" असं मी केव्हा म्हटलं ? तूं फडक्यांच्या कादंबरींतील प्रणयावर घसरलास म्हणून मी इतकें बोललों. सांगा हो तुम्ही, जीवन हें प्रणयाने भरलेलं आहे की नाही ? जीवनांत जें आहे तें त्यांच्या कादंबऱ्यांत आहे. म्हणूनच आम्हांला त्या आवडतात. त्यांत हो काय चूक आहे ? " तो आवेशाने म्हणाला.

" सांगतें सांगतें. पण तुमचा दोघांचाहि तो आवेश आवरा बाई आधी. नाही तर मला वाटेल हे दोन वाघ या गरीब शेळीला

खाऊन टाकताहेत की काय ?" मृदु व गोड हसत ती म्हणाली.

दोघेहि एकदम खुर्चीच्या पाठीला टेकले.

"हं आता कसे छान दिसताहांत दोघेहि." तसंच हसत ती म्हणाली.

"म्हणजे ?" श्रीनिवासने विचारलें.

"म्हणजे तुम्ही आता receptive mood मध्ये आलांत. दुसरं काय ?" तो तिच्याकडे पाहतच राहिला. पण तिकडे लक्ष न देतां ती म्हणाली,

"खरंच सांगू कां काय वाटतं तें ?"

"हो." तोहि तितक्याच मृदु स्वरांत म्हणाला.

"हें पहा जीवनांत प्रणय आहे हें मान्य. इतकंच काय, पण प्रणय ही एक प्रेरक शक्ति आहे हेंहि मान्य. पण जीवन म्हणजे फक्त प्रणय, प्रणय, प्रणय, असं फडके मानतात असं त्यांच्या कादंबऱ्यांवरून दिसतं. अन् तोहि प्रभावी सामाजिक हित-बुद्धि ठेवून त्यांनी रंगवला नाही. कारण तरुणांच्या मनांत तो केवळ बेजबाबदार सुखलोलुपता निर्माण करतो; कार्यप्रेरक ठरत नाही. मला वाटतं त्यांच्या स्वभावांत फक्त कलासौंदर्याचं अनिवार प्रेम आहे, सखोलपणा नाही. म्हणूनच वाचकांना अंतर्मुख करील, आत्मसंशोधन करायला लावील, या तोडीचीं पात्रं ते निर्माण करूं शकले नाहीत. अशा पात्रांचं वाचकांना मनोमय दर्शन करवून त्यांना अंतर्मुख करणं हेंच तर ललित वाङ्मयाचं माझ्या मतानं मुख्य कार्य असायला पाहिजे. हें कार्य प्रथम हरिभाऊ आपटयांनी केलं. नंतर शरच्चंद्रांनी. फडक्यांचं वैशिष्टय म्हणजे त्यांची 'वर्णनाची ऐट'. पण त्याहि प्रतिभेच्या ते आहारीं गेलेले दिसतात. कोणतीहि शक्ति किंवा प्रतिभा,

संयमाचं अधिष्ठान असल्याशिवाय, मानवी जीवनाला प्रेरक नी पोषक होऊं शकत नाही."

एका दमांत ती इतकें बोलली. त्यांत आत्मविश्वास पुरेपूर भरलेला होता. विचारांत नी वाणींत निश्चितता प्रतीत होत होती. पण स्वरांतील मार्दव व वृत्तींतील सौजन्य तिळमात्र सुटलेलें नव्हतें. तिला मधेच अडवण्याची एकालाहि इच्छा झाली नाही.

"मग काय, त्यांच्या लेखनांत कसलेंच सौंदर्य नाही?"

एक आंवढा गिळून श्रीनिवासने हळूच विचारलें.

"आहे तर. मी देखील अगदी आवडीनं वाचतें ना त्या कादंबऱ्या. पण—"

"पण काय?"

"त्यांच्या कादंबऱ्यांत सौंदर्य आहे म्हणूनच तर वाचतें. रोजचा अनुभव पहा. मिनिटामिनिटाला आपल्या मनांत अनेक गोष्टींपासून सौंदर्य शिरत असतें. पण मनांत शिरणाऱ्या प्रत्येक सुंदर वस्तूला, तिला योग्य अशी व इतकीच जागा स्वतःच्या मनांत देणं यांतच मनुष्याचं मनुष्यत्व आहे—जीवनाचं साफल्य आहे. पण माणसं तशीं वागतात कां? हाच तर खरा प्रश्न आहे. म्हणजे हें मी आपलं माझ्यापुरतं बोलतें हो."

एक श्वास सोडून श्रीनिवास खुर्चीच्या पाठीला टेकला.

"चालूं द्या तुमचा वाद." असें म्हणून ती उठून जाऊं लागली.

"हें काय अक्का? चाललीस? आमचं म्हणणं असं—"

"आतापर्यंत थोडं कां ऐकलं तुमचं म्हणणं? मला कांही कुणाला वादांत जिंकायचं नाही की कुणाचं मतपरिवर्तन करायचं नाही. तुमचं मी ऐकलं. माझं तुम्ही ऐकलं. करूं या आता मनांत तुलना. माझं म्हणणं तुला पटलं नाही तर माझ्यावरची तुझी माया

आटणार आहे की काय, तेवढं मात्र जातांना सांगून जाहो दादा!" हसत हसत, मानेला किंचित पण आकर्षक झटका देऊन ती दारापर्यंत गेली.

"ए अक्का? बस की—"

"माझीं कामं पडलीं आहेत तिकडे. नी खरं म्हणजे तुझ्या मित्राला विश्रांतीची गरज आहे." ती क्षणांत अदृश्य झाली. श्रीनिवासने एकाएकी डोळे मिटले. त्याच्यासमोर तपकिरीची डबी धरून विनायक म्हणाला, "पाहिजे का रे एक चिमूट?"

श्रीनिवास नुसता खुदकन् हसला नी पुन्हा डोळे मिटून पडला. त्या स्थितींत किती वेळ गेला तें कोणालाच कळलें नाही.

"दादाऽ ऊठ. चहा झाला." बरोबर चार वाजतां स्वाभाविक लाडीक स्वरांत कालिंदीची हाक ऐकूं आली. तो लाडीक स्वर ऐकतांच वादानंतर इतका वेळ कसल्या तरी अस्वस्थतेने भारलेलें श्रीनिवासचें मन चटकन् प्रसन्न झालें. अशाच स्वराने संसारांत गोडवा नांदतो की काय अशी पुसटती कल्पना त्याच्या मनाला चाटून जाते न जाते तों चहासाहित्य घेऊन कालिंदी हजर झाली. दोघांचाहि उल्हसित चेहेरा पाहून तिचा गंभीर चेहेरा खुलला. त्याच वृत्तींत ती सामान खाली ठेवीत म्हणाली "दादा, now you will play the mother."

"मी बनवतों आज चहा" श्रीनिवास पुढे झाला.

"वा? म्हणजे काय? मी तें गमतीन म्हटलं हो!"

"अग करूं दे की त्याला. कदाचित तुझं mixture त्याला आवडत नसेल." मधेच विनायकाने असें म्हटल्यावर श्रीनिवासचा चेहेरा गोरामोरा झाला.

"मी असं कधी दर्शवलं कां हो?" आर्जवीस्वरांत त्याने विचारलें.

"छट्. तसे तुम्ही जंटलमन आहांत" मिस्किलपणें हसत ती म्हणाली. तें अनपेक्षित उत्तर ऐकून श्रीनिवाससकट सर्वच हसत सुटले.

अखेरीस चहा बनवला तिनेच.

"अक्का, चला आपण आज सिनेमाला जाऊं. पहिला 'शो' किती वाजतां आहे?"

"खरंच जाऊं या का?" आतुरतेने श्रीनिवासने तोच प्रश्न केला.

"आज? नको." तिने विचारपूर्वक उत्तर दिलें.

"वा? म्हणजे काय?"

"म्हणजे असं. आज कुठे पाहुण्यांना जरा बरं वाटतं आहे. उगीच जास्त त्रास नको आणखी."

"मी आता अगदी छान आहें."

"तें डॉक्टर ठरवणार. पेशन्ट नव्हे."

"तूं काय याची डॉक्टर आहेस वाटतं!"

"हो तर. निदान इथल्या मुक्कामापुरती तरी खास." शेवटचा निकाल दिल्यासारखें बोलून ती चहाचा ट्रे घेऊन गेली. श्रीनिवासला वाटलें "आपलं बरं वाईट ठरवणारी ही कोण?" त्याला विरोध करावासा वाटला. त्या तयारींतच तो होता तोंच खोलींत प्रवेश करीत कालिंदी म्हणाली, "मग चलायचं ना सिनेमाला, साडेसहाला आहे सुरवात."

"नको. घरींच मारूं या गप्पा." तिचें सहजतेचें बोलणें नी आविर्भाव पाहून श्रीनिवासच्या मनांतील विरोधी भावना एकदम थंड झाली व तो उत्तर देऊन चुकला. दुसरीकडे तोंड फिरवून कालिंदीने हसूं दाबलें व ती म्हणाली "बरं तर; जरा ऊन उतरलं की चल रे दाद

-यांना घेऊन आपल्या Kitchen garden मध्ये. मला तूं वांग्याच्या झाडावरील किडयाविषयी सांगणार आहेस ना?"

"हो. विसरलोंच की."

. तुलसीवृंदावनाजवळ प्रशस्त अंगण होतें व पलीकडे कुंपण घालून लहानशी बाग केली होती. एका बाजूस निरनिराळ्या रंगांचे गुलाब, तीनचार मोगऱ्याचीं व निशिगंधाचीं झाडें होतीं. फाटका-वर कमान करून जुईचा वेल सोडला होता. दुसऱ्या बाजूस भाजीपाला लावला होता. संध्याकाळच्या सूर्यप्रकाशांत ती टुमदार बाग श्रीनिवासला फारच सुंदर वाटली.

"आणखी कां नाही लावलीं फुलझाडं?" त्याने विचारलें.

"आमच्या तिघांकडून मेहेनत होईल तेवढींच लावलीं झालं."

"अरे तसं नाही. तिच्या त्या Philosophical enjoyment च्या कल्पनेंत मोठी बाग बसत नाही." विनायक म्हणाला.

"चल. उगीच कांही तरी काय रे?"

"खोटं आहे की काय?"

"अन् खरं असलं तरी त्याचं प्रदर्शन कां करायचं असतं? मुकाटयानं आस्वाद घेण्यासारख्या पुष्कळ गोष्टी जगांत असतात, एवढं सुद्धा तुला कळत नाही का रे दादा?"

"नाही बुवा. श्री, तूं घे बाबा मुकाटयानं या बागेचा आस्वाद. मी बघतों त्या वांग्यावरची कीड."

संध्याकाळचा वेळ त्या बागेंत इतका छान गेला की सिने-माला जाण्याचें रहित केल्याबद्दल श्रीनिवासने 'आपल्या डॉक्टरांचे' मनांतल्या मनांत आभार मानले.

रात्रीचीं जेवणें आटोपल्यावर काम आवरून कालिंदी त्यांच्या खोलींत आली, तों श्रीनिवास आपलें अंथरूण पुन्हा झाडून नीटनेटकें घालीत होता. पुस्तकाआडून विनायक दोघांकडे आलटून पालटून

पाहत होता. श्रीनिवास आपल्याच कामांत चांगला १५।२० मिनिटें दंग होता. कालिंदी स्वतःचा चेहेरा शक्य तेवढा सौम्य ठेवण्याचा प्रयत्न करीत होती. शेवटीं कंटाळून ती आपल्या खोलींत गेली. ती पुनः परत आली नाही. शेवटीं एकदा मनासारखें सर्व झाल्यावर श्रीनिवास आरामाने खाली बसणार, तों ती गेलेली त्याला आढळून आलें. " काय ? गेल्या वाटतं त्या ? "

" कोण ? "

" तुझी अक्का."

" केव्हाच. तुझ्या टिचक्यांनी उडालेला धुरळा माझ्या तपकिरीप्रमाणें तिच्या नाकांत घुसत होता म्हणून पळाली बिचारी."

" चल कांही तरीच."

" विचार पाहिजे तर. आणूं बोलावून ? "

" नको नको."

" कां रे ? "

" तसं नाही. पण दमली असेल ना तुझी बहीण." यानंतर दोघेही जण कांही वेळ स्तब्ध होते.

" ही देखील तुझी बहीण आहे, असं केव्हाही सांगितलं नाहीस मला ? " श्रीनिवासने शेवटीं स्तब्धतेचा भंग केला.

" योग्य वेळीं सांगणार होतों."

" योग्य वेळ ? ती कोणती ? "

" प्रेमाताईकडून तुला सरळ इथं घेऊन आलों ती."

" पण गाडींत तसं कांहीच म्हणाला नाहीस."

" सांगायचं काय ! प्रत्यक्ष दर्शन घडवलं ना ! "

पुनः कांही वेळ स्तब्धतेंत गेला.

" ही मावसबहीण की आत्येबहीण ? "

" मावसबहीण. मला दोन मावशा. आलं लक्षांत ? "

" आलं. त्यांना जाऊन किती दिवस झाले ? "

" योगायोगच आहे तो एक विलक्षण. तीनचार वर्षांपूर्वी माझी आई नी दोन्ही मावशा एक वर्षांत गेल्या."

" अक्काचे वडील काय करतात ? "

" ते रिटायर्ड इंजिनियर आहेत. पण इतिहाससंशोधनाचा नाद आहे त्यांना."

" इंजिनियर नी इतिहास ? विलक्षण जोडी आहे ! "

" सायन्सकडचीं मुलं इंग्रजी चांगलं लिहितात. डॉक्टर लोकांना गाण्याचा शोक असतो नी माझ्यासारख्या नांगऱ्यांना वाङ्मयाची भक्ति असते ना ? तसलाच हाहि एक प्रकार आहे. "

" पेन्शन बरंच मिळत असेल. "

" संसाराला कुठंच कमी पडत नाही हें दिसलंच की तुला."

पुन: थोडा वेळ शांत होतें.

" कितपत शिकली आहे तुझी बहीण ? "

विनायकाने उत्तर दिलें नाही.

" का रे ? गुपचूपसा बसलास ? "

" विचार करीत होतों, तुझ्या प्रश्नांच्या मागे curiosity आहे की interest आहे." गंभीरपणाचा आव आणून विनायक म्हणाला.

" दुपारीं फडक्यांच्या कादंबरीविषयीचे त्यांचे विचार ऐकून विचारावंसं वाटलं. "

" असं होय ? मग एकदमच सांगतों. ऐक. थर्ड इयरच्या शेवटीं कॉलेज सोडलं तिनं. इंटरला तर्कशास्त्र नी अर्थशास्त्र; बी. ए. ला इतिहास, तत्त्वज्ञान हे विषय घेतले होते तिनं."

" पण यांत मराठी तर कुठंच दिसत नाही. "

" परीक्षेला जो विषय घेतला त्याची ' माहिती ' मेहेनतीमुळं मनुष्य मिळवूं शकेल. पण त्या विषयाविषयीं त्याला " दृष्टि " येईलच असं सांगतां येत नाही. तुला काय वाटतं ? "

" तथ्य आहे तुझ्या म्हणण्यांत." विचार करून श्रीनिवास बोलूं लागला. " बरंच वाचलेलं दिसतंय तिनं."

" वाचते थोडं. निरीक्षण जास्त करते. विचार त्याहून जास्त करते. बोलते मात्र योग्य वेळीं व जरूर असेल तेव्हा. "

श्रीनिवासला पुन: विचार करीत बसावेंसें वाटलें.

" कॉलेज मधेच कां सोडलं ? "

" एक तर हल्लींचं युनिव्हर्सिटी एज्युकेशन तिला पसंत नाही. अन्—"

" अन् काय ? "

" वैवाहिक जीवन हेंच आपलं खरं जीवन आहे असं विचारांतीं तिला वाटलं, म्हणून तिनं लग्न करायचं ठरवलं आहे."

" लग्न होईपर्यंत शिकायला काय हरकत होती ? "

" सांगितलं ना, तिचा हल्लीच्या शिक्षणपद्धतीविरुद्ध आक्षेप आहे म्हणून. "

" कोणता आक्षेप ? "

" तिलाच विचार. आणूं बोलावून ? "

" नको नको तूच सांग. "

" तिच्याइतकं स्पष्ट नी निश्चित मला नाही सांगतां यायचं."

पुन: थोडा वेळ गेला.

" तूं म्हणतोस ती बोलते कमी म्हणून. पण तसं कांही दिसत नाही."

" कमी बोलते असं म्हणालों नाही. योग्य वेळीं नी जरूर असेल तेव्हा बोलते असं म्हटलं. शिवाय तिच्या वडिलांच्या गैरहजेरींत

पाहुण्याची व्यवस्था व रंजन करण्याचं काम तिचं आहे या गोष्टीची जाणीव तिला दिसत आहे."

श्रीनिवासने एकदम डोक्यावरून पांघरूण घेतलें. थोडा वेळ विनायकाने वाट पाहिली. नंतर तोही निजला.

—९—

"आज तुम्ही घनश्यामाला ठोकलेली आरोळी नाही ऐकू आली ती?" दुसरे दिवशीं सकाळीं चहाचे वेळीं विनायकाने विचारलें.

"तसा कांही माझा नियम नाही. आई म्हणत असे म्हणून मीहि म्हणतें झालं स्वतःच्या करमणुकीसाठी." ती सरळपणें म्हणली.

"असं होय? हो, आमच्या श्रीनिवासचा गळा देखील छान आहे बरं का."

"अगबाई! खरं का? मग केव्हा ऐकवणार आम्हांला?

"याचं काय ऐकतां? मीही आपल्या स्वतःच्या करमणुकी-साठी गुणगुणतों झालं."

"हें पहा आता तुम्ही दोघंही एकमेकांच्या करमणुकीसाठी म्हणा पाहूं. माझा हिशोब देखील घेऊं नका. चोरून गाणं ऐकण्याची मला सवय आहे."

"बरं बरं. पी तो चहा अगोदर. मग पाहूं गाण्याचं. आज आपण मॅटिनीला जाऊं या. मग रात्रीं यांचं गाणं."

"हं. हा ठीक आहे कार्यक्रम." विनायकाने पुष्टि दिली.

"अग रखमा आज जरा लौकर ये बरं का धुणंभांड्याला." मोलकरीण आलेली पाहून कालिंदी म्हणाली.

"तें नाही जमायचं बाई."

"अग आजच्याच दिवस म्हणतें आहे तर—"

" तें नाही व्हायचं. वाटलं तर ठेवा नाही तर राहिलं."

मोलकरणीचा तो उच्च स्वर व काम सोडण्याची धमकी नित्याचीच होती नि त्यांत कांही अर्थही नसे. पण आज कालिंदीला तें सहन झालें नाही. तिच्या कपाळाची शीर उभी राहिली. चहाचा कप तसाच टाकून ती आपल्या खोलींत गेली व तडाख्याने परत येऊन भांडीं घासायला बसलेल्या मोलकरणीसमोर तिने पैसे ठेवले. " हा तुझा पगार. ठेव तीं भांडीं नि चालती हो अगोदर." शांत, निश्चयी स्वरांत ती बोलत होती.

" हें काय बाई ? जरा कुठं बोललें तर रागावतां ? "

" आधी भांडीं खाली ठेव नि रस्त्याला लाग."

मालकिणीच्या चेहऱ्याकडे पाहिलें मात्र, तिने मुकाट्याने भांडीं खाली टेवलीं व खाली मान घालून डोळ्यांना पदर लावीत निघून गेली.

दोघांनीही चहाच्या खोलींतून हा प्रकार बघितला. कालिंदी पूर्वीच्याच शांतपणे परत आली नि जसं कांही झालंच नाही अशा रीतीने चहा पिऊं लागली. विनायकाला राहवलं नाही. "मी आणतो दुसरी शोधून."

" एकदम कुठली या दिवसांत मिळायला. नि मिळाली तरी पहिलीच बरी म्हणायची पाळी यायची."

" मग कशाला घालवून दिलीस, भांडीं घाशीत होती तर ? "

" इतके दिवस केलं सहन. यांना वाटायला लागलंय् आपल्यावाचून अडतं या पांढरपेशा बायकांचं."

" खोटं आहे कां तें ? "

" अगदी खोटं."

" म्हणजे दुसरी मोलकरीण आहे वाटतं संग्रहीं ? "

" हो तर. उगीच धालवली वाटतं तिला."

" कुठं रहाते ती ? आणतों बोलावून."

" नको. येईल तेव्हा दिसेलच. सकाळच्या थंड हवेंत जरा हिंडा ना बागेंत. जरा बरं वाटेल." श्रीनिवासकडे पाहून ती म्हणाली. ते दोघेही बागेंत गेले नि पांच दहा मिनिटांनी मागे वळून पहातात तों एक जुनी साडी नेसून कालिंदी भांडी घासते आहे. तीं घासून आंत नेल्यावर थोडया वेळांत पूर्वीच्याच पोषाखांत एका हातीं फुलाची परडी व दुसऱ्या हातीं टोपली घेऊन ती बागेंत आली.

" दे इकडे परडी. मी काढतों फुलं."

" तुम्हांला भरलीं वांगीं आवडतात कांहो ?" विनायकाचं बोलणं टाळून तिनं श्रीनिवासला प्रश्न केला.

" हो तर. खूप आवडतात."

" मग आज तोच घेत. ऊन बरंच झालंय. जाना घरांत. इच्छा असली तर स्नान करून घ्या." यावर विनायक हसला.

" हसायला रे काय झालं ?"

" स्नान करून नव्या मोलकरणीला लौकर धुणं हवं आहे म्हणून."

" इश्श. काल यांचं स्नान झालं नव्हतं म्हणून सहज म्हटलं."

" मी देखील सहज म्हटलं. चल रे श्री, आपण स्नान करून घेऊं." आंत येऊन न्हाणीघरांत दोघांनीही डोकावलें तर बंब ऊन पाण्याने सळसळत होता. श्रीनिवासला स्नान करण्याची अनिवार इच्छा झाली. समोर पाहिले तर दोघांचेंही धोतर-रुमाल खुंटीवर ठेवलेले. तो स्नानाला गेला. मात्र तब्बल पाऊण तासानंतर त्याने न्हाणीघराचें दार उघडलें. बाहेर लुगडं टॉवेल हातीं घेऊन कालिंदी निश्चल उभी होती. तो आपल्याच नादांत निघून गेला.

आंत गेल्यावर तिला दिसलें की त्याने धोतररुमाल धुवून वाळत घालण्याकरतां पिळे दांडीवर ठेवले आहेत. ती किंचित् थांबली. नंतर तिने ते नीट झटकून दांडीवर वाळत घातले व स्वतः स्नान करून स्वैपाकाला लागली. नंतर विनायकाचें स्नान झालें. तो श्रीनिवासला घेऊन एकाएकी स्वैंपाकघरांत येऊन थडकला.

"अं ! इथं रे कशाला आलांत ?"

"हा काय prohibited area आहे की काय ? "

"होच मुळी. स्वैंपाकघर म्हणजे आम्हां स्त्रियांची प्रांतिक स्वायत्तता आहे."

"अग, त्या स्वायत्तेंत अडचणी निर्माण झाल्या तर बाहेरून मदत घ्यावी लागते ना. सांग, काय मदत करूं ?"

"नको रे बाबा तुझी मदत. तूं बाहेर जा कसा. पुरुषांनी घरांत सगळीकडे जावं. फक्त स्वैंपाकघरांत डोकावूं नये असा नियम आहे."

"कां ?"

"एवढंही माहीत नाही ? स्त्रियांच्या व्यायकीची खरी कसोटी म्हणजे त्यांचं स्वैंपाकघर. तें जर नीट नसलं तर एखादा नवरोबा काडीमोड देखील घ्यायला चुकायचा नाही." प्रथमच खूप मोठ्याने हसत ती म्हणाली व कणीक पुरती मळायला बसली.

"कायरे श्री, तुझं काय मत आहे या सिद्धांतावर ?"

"मला तर इथं निजावंसं वाटतं" इतका वेळ उभा राहून चोहोंकडे नजर टाकीत असलेल्या श्रीनिवासनें खरोखरीच एक पाट घेऊन त्यावर बैठक मारली. या चोखंदळ वृत्तीच्या माणसाचे हे सरळपणाचे उद्गार ऐकून तीं दोघेंहि क्षणभर स्तंभित झालीं.

"आता नाहीना आमचा श्री तुला पाहुणा वाटत ?"

"म्हणजे काय?" आपले गंभीर डोळे रोखून कालिंदीने विचारलें.

"बाबांच्या गैरहजेरींत पाहुण्यांना अगदी घरच्यासारखं वाटावं म्हणून तुझी जी खटपट चालली होती, तिला आता कुठं यश येतंयसं दिसतं."

"असं होय? दिसतंय खरं थोडंसं." कणकीचे हात धुवायला ती उठली व मोरीकडे गेली. इतक्यांत शेगडीवरचें दूध वरतीं येऊन किंचित् खाली सांडलें व त्याचा वास आला. ती एकदम मागं वळून पाहते तों तें खाली उतरत असतांना श्रीनिवास तिला दिसला. त्याचीं बोटं भाजलीं म्हणून तो फुंकर घालूं लागला. एक क्षणभर तिने तिकडे पाहिलें नि चटकन् म्हणाली—

"पाहिलंस दादा, काम असं दिसावं लागतं. सांगावं लागत नाहीं. नाही तर तूं! काम सांग म्हणून म्हणत होतास."

"अग दुपारच्या चहाला दूध राहणार नाही म्हणून या चहाबाजानं बोटं भाजून घेतलीं स्वार्थाकरतां. माझ्यासारखी निष्काम मदत होती कां याची?"

"असं होय? मग अहो निष्कामकर्मयोगी श्रीकृष्ण महाराज, तेवढी माझ्या खोलींतून स्नोची बाटली आणून द्या पाहुण्यांना अगोदर. मीच आणतें नाही तर."

"थांब. आणतोंना मी."

"नको. जातां येतां अनेक निष्काम कर्मं करीत वेळ घालवाल, नि इकडे पाहुणा तळमळत ठेवाल." तिने झटकन जाऊन बाटली आणून त्याच्यासमोर ठेवली. "हं कर तुझं निष्काम कर्म लौकर." पुन्हा एकदा मनमोकळ्या हास्याचा निनाद सगळीकडे पसरला. तो ओसरल्यावर कालिंदी पुन्हा आपल्या कामाला लागली. दोन शेगड्यांवर एकाच वेळीं शिजणाऱ्या जिनसांत योग्य वेळीं तिखट-

मसाला लक्षपूर्वक घालणें, पळी, लाटणें वगैरे जिनसा घाईने जमिनीवर न ठेवतां निराळ्या ताटांत ठेवणें, मोरीवर हात धुवीत असतां बेताने पाणी सांडून त्याची ओल बाहेर न येऊं देणें, भिजलेले हात लुगड्यालाच वेळोवेळीं न घासतां खिळ्याला टांगलेल्या खादीच्या रुमालाला पुसणें, भांडीं, डबे वगैरे घेतांना व परत ठेवतांना शक्य तों कमी आवाज करणें, स्वयंपाकाकडचें लक्ष कमी न होऊं देतां चाललेल्या संभाषणांत यथोचित भाग घेणें, इत्यादि तिच्या क्रिया इतक्या आकर्षक हालचालीने होत होत्या की श्रीनिवासच्या सौंदर्यदृष्टीला एक नवीनच खाद्य पुरविलें जात होतें. मधूनच त्याच्या तें ध्यानांत येई ना अशा स्थितींत स्वैपाकघरांत बसण्यांतही एक प्रकारचा आनंद असूं शकतो हें त्याला दिसूं लागलें. संभाषणांत त्याचें लक्ष बेताचेंच होतें. मधूनच त्याच्या तें लक्षांत येई व मग मधेच तो कांही तरी बोले. असेंच एकदम त्याने विचारलें.

" कां हो, इंटर बी.ए.ला तुम्ही निरनिराळे विषय कां घेतले ? "

" तुम्हांला कुणी सांगितलं ? "

" असं काल बोलतां बोलतां कळलं. माफ करा हं, जरा नको असेल तें विचारलं असेल तर. "

" छे, तसं कांही नाही. माझे खरे आवडीचे विषय म्हणजे वाङ्मय नी इतिहास. दुसरे विषय घेतले तें कांही उद्देशानं. "

" तो कोणता ? "

" मला वाटत, ईश्वरानं निर्माण केलेल्या सर्वव्यापी व विविध ज्ञानामध्ये माझे विषय म्हणजे एक भाग आहे. माझ्या खऱ्या आवडी-च्या विषयांचं यथातथ्य असं ज्ञान जर मला हवं असेल तर तें इतर विषयांच्या ज्ञानाशीं तुलना करूनच मला मिळूं शकेल. तसं जर केलं नाही, तर माझ्या आवडीच्या विषयांविषयी भलताच अहंकार

मला वाटूं लागेल नी त्यामुळे आपोआपच माझी मनोवृत्ति आकुंचित होईल. म्हणून जमेल तितक्या जास्त विषयांची माहिती करून घ्यावी असं वाटतं. खरं म्हणजे—" ती एकदम थांबली.

"थांबलात कां? सांगा ना."

"तसं नाही. पण वाटतं तें नीटपणे सांगतां येणार नाही असं थोडक्यांत, नी या दादाचे डोळे तर जेवणाकडे लागलेले दिसताहेत. चला आता जेवायला बसूं या. जरा पाय मोकळे करून या, तोंवर मी पानं घेतें." तिने विषय सफाईने बदलला. श्रीनिवास चूप बसला खरा, पण बोलणाऱ्या व्यक्तीच्या मनाचें एक नवीनच दालन उघडतें तोंच बंद झालेलें पाहून आणखी आंत डोकावण्याची त्याची जिज्ञासा मात्र उलट वाढली. थोड्या वेळाने जेवायचें बोलावणें आलें. तिघांनीही एकदमच बसायची सूचना विनायकाने केली. "पुरुषांनी बायकांबरोबर जेवायला बसूं नये." असं म्हणून कालिंदीने विरोध केला.

"तें कां?"

"बायकांचं खाणं राक्षसी असतं—पुरुषांना तें पाहवणार नाही."

"कोण लेकाचा म्हणतो असं?"

"लेकाचा नव्हे. शरच्चंद्रांची एक नायिका तसं म्हणते."

विनायक चूप बसला पण श्रीनिवास मुकाट्याने स्वैंपाकघरांत गेला व तिसरं ताट नी वाटी घेऊन आला. तो अन्नाचीं भांडीं आणायला जातो आहे असे पहातांच विनायकाच्या हातांतलें वर्तमानपत्र घेऊन तिने टेबलावर घातलें. जळक्या भांड्यांनी मेणकापड खराब होऊं नये म्हणून केलेली ही योजना पाहून विनायक प्रसन्न झाला. मग मात्र राहिलेलीं सर्व भांडीं तिने स्वतःच आणलीं व त्यांच्याबरोबरच ती जेवायला बसली. मनाप्रमाणें वाढायची तिची इच्छा पूर्ण झाली नाही म्हणून तिला वाईट वाटलें,

तरी श्रीनिवासच्या सुजाण मनोवृत्तीचे तिने मनांतल्या मनांत कौतुकच केलें. वेळ प्रसंगीं सर्वांनी अशा रीतीने एकदम जेवायला बसण्यांतही एक प्रकारचा निराळा आनंद आहे हें तिच्या लक्षांत आल्यावाचून राहिलें नाही. पण ती बोले मात्र कमी. त्या दोघांचें संभाषण चालू ठेवण्याकरतां अचूक शंका विचारी नी मग सर्वांना पाहिजे त्या जिनसा वाढीत असतां प्रसन्न मुद्रेने संभाषण ऐकत राही.

" आज मॅटिनीला जायच ना ? " जेवणाच्या शेवटीं तिने विचारलें.

" हो हो तर " दोघेही एकदमच म्हणाले.

" पण चित्रपट कोणते लागले आहेत ? " श्रीनिवासने विचारले.

" आहेत दोनतीन. पण 'जबाब' पुन्हा एकदा लागलं आहे, तेंच पाहूं या का ? "

" मलाही पुन्हा पहावस वाटतं " विनायक उल्हासाने म्हणाला. श्रीनिवासलाही तसेंच वाटलें.

" ठरलं तर. २॥ वाजतां मॅटिनी आहे. तयार रहा. " तिने इशारा दिला. हात धुवून दोघें बाहेर येतात, तों रखमाचा नवरा तिला पुढे घालून आंत येत होता.

" बाई आहेत कां घरांत ? "

" आहेत. " विनायकाचें उत्तर ऐकतांच तो तिला घरांत घेऊन गेला नी पांच मिनिटांनी परत आला.

" कायरे ती तुझी बायको वाटतं ? " विनायकाने विचारले.

" हो महाराज. "

" मग ती कुठं आहे ? "

" भांडीं घासायला बसली आहे."

" तिला नोकरीवरून काढलं होतं ना?"

" पुष्कळ ठिकाणीं नोकरी केली महाराज. कुठं पोटावर तर कुठं पाठीवर मारतात. पण बाई कुठंच मारीत नाहीत. मी घरीं आलों तर रडत होती म्हणून आणून घातली नी बसवली भांडीं घासायला." इतकें बोलून तो चालता झाला. श्रीनिवास विचार-मग्न झाला. विनायक शीळ वाजीत फेऱ्या घालूं लागला.

दोन वाजतां चहा झाला. श्रीनिवासने न्हाणीघरांत जाऊन तोंड धुवायला सुरवात केली. तो कपडे करून बाहेर आला तर विनायक व कालिंदी व्हरांड्यांत त्याची वाट पहात होते. दोघांच्याही लक्षांत येईल अशा रीतीनें कालिंदीनें आपल्या घड्याळाकडे बघितलें.

" किती वाजले ग?"

" पावणेतीन." तिनें गंभीरपणें उत्तर दिलें.

" चला, चित्र सुरू देखील झालं असेल अडीचला. आता जाऊन काय उपयोग?"

" अडीचला नाही, साडेतीनला आहे सुरू. चला लौकर."

" मग मघाशी अडीच कां म्हणालीस ग?"

" उगीच आपलं. बायकांना पोषाख करून पुरुषांबरोबर बाहेर पडायला उशीर लागतो अशी अख्या पुरुष जातीची तक्रार आहेना! म्हणून."

विनायकने श्रीनिवासकडे एक कटाक्ष टाकला. तो आपल्या सूटवरची धूळ झाडीत होता व चोरून कालिंदीकडे पहात होता. नऊवारी काळी चंद्रकळा ती नेसली होती. काळ्या व्हॉइलचा ब्लाउज तिनें घातला होता. नेहमीचा किंचित् तिरपा भांग जाऊन तो आज मध्यभागीं आला होता. केसांचा शेपट

जाऊन सैलसा अंबाडा मानेखाली जाऊन स्थिरावला होता. कानांतले लहानसे-इयरिंग्ज् नाहीसे होऊन त्या जागीं कुडया आल्या होत्या. नऊ वारी पोषाखांत तिचा बांधा अधिकच उठावदार दिसत होता. दहापांच पावले चालल्यावर विनायकानें तिला डवचलें.

" काय अक्का ? आज हा थाट कशाकरतां ? "

" एवढं विचारलंस मुद्दाम तर तूंच तर्क कर की. "

" बायकांची मिरवण्याची जन्मजात हौस. दुसरं काय ? "

" अगदी सामान्य माणसाप्रमाणं केव्हापासून बघायला लागलास रे ? " हसत हसत तिनें टोमणा मारला.

" खोटं आहे का ? "

" तें नाही मला ठाऊक. पण तर्क सामान्य आहे एवढं खरं."

" मग असामान्य काय आहे ते सांग ना."

" बाहेरच्या जगाला काय वाटतं ते काय करायचं आहे ! पण घरांतल्या माणसांची पर्वा जरूर करावी. ते एक शास्त्र आहे. "

" हें कोणतें बुवा नवीन शास्त्र ? "

" अरे रोज तोच पोषाख केला की मनुष्य लगेच जुनं वाटायला लागत. तेंच कुवतीप्रमाणं जरा फरक करीत राहिलं की तेंच मनुष्य रोज नवीन दिसतं. निदान स्त्रिया तरी घरांतल्या पुरुषांना रोज नवीन दिसायला पाहिजेत. तरच स्त्रियांना जगण्याची कांही आशा आहे. तें एक शास्त्र आहे. " इतकें बोलून ती थांबली व आपण जरा जास्त बोललों तर नाही ना या शंकेनें एकदम म्हणाली, " आतां दिसलीच की नाही तुझी अक्का तुला नवीन ? "

" हो बुवा. म्हणून तर विचारलं. "

" मग घे चांगली चमचाभर तपकीर नी कर मेंदू साफ."

तिघेही हसले. रस्त्याभर श्रीनिवास याच संभाषणाचा विचार करीत होता. तिच्या बाह्य सौंदर्याकडे आकृष्ट झालेली त्याची दृष्टि तिच्या अंतरंगावर आता स्थिर झाली.

सिनेमाहून परत येतांना तिने श्रीनिवासला सहज विचारले—

" काय ? आवडलं का चित्र ? "

" हो तर. काननबालाची गाणीं छान आहेत. " त्याने पटकन् उत्तर दिलें नी मग रंगांत येऊन कोणत्या नटीचा गळा कसा आहे प्रत्येकाने किती चित्रपटांत काम केलें आहे याचें वर्णन करून तो इंग्रजी चित्रांवर आला. विनायक मधून मधून त्याला प्रश्न विचारीत होता. शेवटीं घरांत पांऊल टाकायच्या वेळीं त्याने कालिंदीला विचारले, "का ग ? तूं अगदी चूप आहेस मघापासून ?"

" चित्रपट आवडला का म्हणून विचारलें नाही का यांना ?"

" पण नंतर अगदी गप्प होतां हें कांहीं खोटं नाही." श्रीनिवास म्हणाला.

" I was developing an ability to listen while you were talking about actors, and actresses. " शांतपणें उत्तर देऊन ती कपडे बदलायला आपल्या खोलींत गेली.

" याचा अर्थ काय रे ? " श्रीनिवासने विचारले.

" कळेल पुढे मागे. घाई कसली आहे ? "

श्रीनिवास आश्चर्य करीत राहिला. दोघेही आपल्या खोलींत जाऊन बसले. कांहीं वेळाने रखमा आली. " बाईंनी हें मागितलें आहे. " विनायकाच्या होल्डऑलकडे बोट दाखवून तो ती घेऊन गेली.

" हें कशाकरतां रे ? " श्रीनिवासने उत्सुकतेने विचारले.

"माझे कपडे एकदा धुवून स्वच्छ करून दिल्याशिवाय तिला चैन पडत नाही. त्यांतून या खेपेस त्यांच्यावर तपकिरीचीं पुटं चढलेलीं."

"मग सोड ना ती तुझ्या बहिणीकरतां तरी."

"सोडीन. तिच्याकरतांच सोडीन. ती वेळ येऊं दे."

"मग विचार ना तिला मोडण्याचा मुहूर्त."

"अगदी खरं बोललास. मुहूर्त ठरवणं तिच्याच हातीं आहे."

श्रीनिवास त्याच्याकडे आश्चर्याने पाहूं लागला. विनायकाने स्वतःची आवडती कादंबरी 'कलंकशोभा' काढली नी तो वाचनांत दंग झाला. थोड्या वेळाने ओचापदर ओला झालेल्या स्थितींतच कालिंदी घाईघाईने आली, "हें रे काय दादा तुझं?"

"काय झालं ग?" जोरजोराने श्वासोच्छ्वास करीत असलेल्या बहिणीकडे पहात विनायकाने विचारलें.

"कामाच्या भरात मला एक नाही राहिली आठवण, तर यांना चहा पाहिजे कां तें सुद्धा विचारूं नयेस ना? अन् तुम्हीसुद्धा पुन्हा पाहुण्यासारखे वागायला लागलांत की?"

श्रीनिवासकडे एकदम वळून तिने म्हटलें. आणखी एक नवीन प्रकारचे सौंदर्य पहाण्यांत त्याचे डोळे गुंतले होते. तिच्या अनपेक्षित प्रश्नामुळे तो भानावर आला.

"तसं नाही कांही. दुपारीं घेतलाच होता."

"म्हणून आता नको असं थोडंच आहे."

"छे छे, इच्छाच नाही आतां." तिच्या दमलेल्या शरीराकडे पाहून तो निश्चयाने म्हणाला.

"मग इलाजच नाही. बरं तर. जेवायच लौकरच करतें. तोंवर जरा भटकून या हवं तर." उत्तराची वाट न पहातां ती निघून गेली. त्याला स्वैपाक मुळीच करतां येत नव्हता. पण जसे

येतील तसे दोन जिन्नस स्वत: करावेत असें मात्र त्याला या वेळीं तिच्याकडे पाहून वाटलें.

रात्रीच्या जेवणावर यथेच्छ हात मारून दोघेजण खोलींत आले. पाठीमागचं सर्व आवरून कालिंदी स्वतःच्या खोलींत गेली.

" चल, अक्का कुठे आहे तें शोधून काढूं. " श्रीनिवासच्या संमतीची वाट न पाहतां विनायक त्याला हाताला धरून तिच्या खोलींत घेऊन गेला. आंत पाऊल टाकतांच समोरील दृश्याने त्याचें मन वेधून घेतलें. कालिंदी आपल्या पलंगावर पडली होती. डोळे मिटले होते. पांढरें स्वच्छ पांचवारी पातळ ती नेसली होती. तिने केस मोकळे केले होते व ते स्वैरपणे तिच्या मानेभोवती व उशीवर पसरले होते. जवळच टेबल लँप असून त्याच्या निळ्या काचेतून मंद प्रकाश तिच्या शांत चेहऱ्यावर पडला होता. हातांत शरच्चंद्राची 'परिणीता' ही लहानशी कादंबरी होती. क्षणभर दोघेही तें दृश्य पाहत राहिले. पण स्त्रियांच्या खाजगी बसाउठाय-च्या खोलींत अशा रीतीने जाणें योग्य नाही याची जाणीव होऊन श्रीनिवास परतत होता, तोंच "काय अक्का, झोप आली वाटतं ?" अशी विनायकाने हाक मारली.

ती चटकन उठून बसली. पदर व केस आवरतांना मुग्धपणे हसत म्हणाली "याना, असे उभे कां ?"

ते आंत आले. विनायक तिच्या पलंगावर बसला. ती उठली व टेबलावरील जिनसा आवरीत असतां श्रीनिवासने धावत्या नजरेने खोलीचें निरीक्षण केलें. पांढरी स्वच्छ चादर घातलेला बिछाना; उशीच्या अभ्र्यावर एका बाजूस रेशमाने केलेलें नाजूक काम. समोरच्या भिंतीवर प्रार्थना करीत असलेल्या स्थितींतलें एका लहान मुलाचें भावपूर्ण चित्र; उशाशीं टेबल,

त्यावर लालहिरवी पेन्सिल. फाउन्टनपेन व लेटरपॅड, खुर्चीसमोर ठळक आकड्यांचें Caltex चें कॅलेंडर, खोलीच्या दुसऱ्या बाजूला माणिकची कॉट. त्यापलीकडे पुस्तकांची रॅक. जवळच स्टँड नी त्यावर एकदोन रोजच्या साड्या व दुपारीं नेसलेली चंद्रकळा घडी करून ठेवलेली. टापटीप नी साधेपणा यांचें सौंदर्य त्या खोलींत इतस्तत विखुरलेलें दिसत होते.

"वसा ना." खुर्चीकडे बोट दाखवून तिने पुन्हा म्हटलें तेव्हा श्रीनिवास भानावर आला नी बसला.

"काय वाचीत होतां?" त्याने विचारलें.

"शरदबाबूंची 'परिणीता'. एक पात्रप्रधान प्रदीर्घ कथा आहे."

"तुमच्याजवळ त्यांची आणखी पुस्तकें आहेत?"

"जवळजवळ सर्व. पाहायचीं आहेत?"

"मी पहातो." असें म्हणून तो पुस्तकाच्या रॅककडे गेला. सर्व संग्रहावरून त्याने नजर टाकली. "यांत इतिहास. तत्त्वज्ञान नी काव्य यांचा भरणा जास्त दिसतो."

"तेच वाचन अलीकडे मी जास्त करते."

"कां? म्हणजे हरकत नसेल तर सांगा." जरा संकोचाने तो म्हणाला.

"त्यांत कसली हरकत? काव्यामुळे माणसाच्या कल्पनाशक्तीची वाढ होते. पण म्हणून मनुष्य निष्क्रिय बनूं नये म्हणून तिला व्यवहारबुद्धीची जोड देण्याकरतां इतिहास. इतक्यानेच जीवनांत भागत नाही: मनाची शांति नी श्रद्धा यांचं अधिष्ठान जवळ असावं लागतं म्हणून तत्त्वज्ञान."

अगदी सहज भावाने ती बोलली त्यामुळे श्रीनिवास जास्त धीट झाला. "मग बाकीचे विषय नी शास्त्रें कुचकामाचीं का?"

"छे छे. असं नाही कांही ठरत. उलट इतर विषयांची शक्य तितकी माहिती करून घेऊन तिची तुलना आपल्या विषयांतील माहितीशीं केली म्हणजेच त्यांतील सत्य खऱ्या स्वरूपांत दिसूं शकतं. तुलना करण्याच्या सवयीनेच बुद्धीला प्रगल्भता येते नी विशेष म्हणजे मनाचं स्वास्थ्य—ज्याला आपण Mental repose म्हणतों ना ?—तें लाभतं."

"या मन:स्वास्थ्याला तुम्ही इतकं महत्त्व देतां ?"

"मी नाही देत. तें आहेच. बाहेरचा कोणचाही उद्योग यामुळे इतरांपेक्षा जास्त चांगला करतां येतो. पण विशेष म्हणजे संसार चांगला करतां येतो, ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे." जणू काय स्वानुभवाचेच शब्द ती बोलत होती.

"संसार ?—" एवढंच बोलून श्रीनिवास थांबला.

"कां बरं ? शंका आहे की काय ?"

"नीटसं कळलं नाही."

"संसार ? संसार म्हणजे माझ्या मतें फक्त प्रश्न सोडवणं. हें मनाचं स्वास्थ्य माणसाजवळ असलं तरच स्वत:चीं मतं नी स्वत:चं मन माणसाला अगोदर निश्चितपणें समजून घेतां येतं. आपल्या प्रिय माणसाच्या गळीं तें युक्तीनं उतरवण्यासाठी त्याच्याशीं अगोदर समरस व्हावं लागतं. ही युक्ति नी समरसता मी म्हणतें तें मन:स्वास्थ्य आपल्याजवळ असल्याशिवाय सुचणार कशी ? नी प्रश्न सुटणार कसे ?"

"संसार म्हणजे काय, नुसते प्रश्न सोडवणं ? त्यांत काय सुख नाहीच ?"

"सुख नाही कसं ? तें बघण्यावर नी मानण्यावर आहे."

"म्हणजे काय ?"

"हें मनःस्वास्थ्यच मुळांत सुखदायी असतं. संसारांत पदोपदीं दत्त म्हणून पुढे उभे राहणाऱ्या प्रश्नांना टाळाटाळी न करतां तोंड देण्याची मनाची तयारी या स्वास्थ्यामुळे कायम रहाते, नी एक प्रश्न सुटल्यावर दुसरा प्रश्न उभा राहीतोंपर्यंत आपल्या प्रिय माणसांचे आनंदित चेहेरे पहाणं यांतच तर वडील माणसांचं सुख साठवलं आहे."

"संसार म्हणजे प्रश्न सोडवणं—! बरोबर आहे. पहा ना आमच्या प्रेमाताईच्या अण्णासाहेबांकडे." विनायक गंभीरपणे मधेच म्हणाला.

"दादा, तुझ्या जिभेला कांही—"

"बोलूं दे मला तूं अक्का. मी सत्य सांगतों. व्यक्तिनिंदा करण्याचा माझा स्वभाव आहे का? स्पष्ट सांग. तुझ्या दादाची या वेळेस भीड ठेवूं नकोस."

"नाही." खाली मान घालून ती हळूच म्हणाली.

"मग झालं तर. अण्णासाहेबाना तत्वज्ञानाची, कोणीही अगदी प्रामाणिकपणें कौतुक करावं, इतकी माहिती आहे. पण तूं म्हणतेस त्याप्रमाणे तीवर स्वतःच्या तुलनात्मक बुद्धीचा प्रकाश पाडून ती माहिती त्यांनी आत्मसात् कुठं करून घेतली? तसं करून त्यांनी मनाचं स्वाथ्य मिळविलं नाही म्हणूनच मावशी गेल्यावर उत्पन्न झालेले संसाराचे प्रश्न त्यांनी नकळत टाळले—तत्वज्ञानाच्या वाचनात स्वतःला बुडवून घेतलें. आणि—" तो थांबला.

"आता कळलं काय तें."

श्रीनिवास एकदम म्हणाला व त्याने एक दीर्घ श्वास सोडला.

विनायक पुढे बोलणार तोंच त्याला थांबवून कालिंदी म्हणाली, "समजलें दादा, तुला काय म्हणायचें आहे तें. पण

माझं म्हणणं इतकंच की सध्याच्या युनिव्हर्सिटी शिक्षणामुळं फार झालं तर आपापल्या विषयांची कमीजास्त माहिती मिळते. मनुष्य एखाद्या विषयांत तज्ञही होतो. पण मनाचें स्वास्थ्य त्याला कितपत मिळवतां येतें ! हा पद्धतीचा दोष आहे पुष्कळसा. पाश्चात्य देशांप्रमाणे येथेही Residential University झाली म्हणजे मी म्हणतें तें मनाचं स्वास्थ्य मिळविण्याकरितां जरूर तें शुद्ध नी स्वच्छ विचारसरणीचं वातावरण म्हणतात ना, तें निर्माण होईल."

वैयक्तिक चर्चेच्या बाजूला झुकलेलें संभाषण असें बोलून तिने पूर्वीच्या पातळीवर आणलें त्याबद्दल विनायकाने तिचें मनांत कौतुक केलें नी त्यांत जणु काय तिला मदत करण्याकरतां त्याने विचारलें.

"हें शुद्ध नी स्वच्छ तें काय म्हणालीस ग ?"

"म्हणजे काय ? सरळ आहे अगदी. पाश्चात्यांच्यासारखी युनिव्हर्सिटी झाली म्हणजे प्राध्यापक विद्यार्थी एके ठिकाणीं राहतील. एकमेकांशीं मोकळ्या मनाने मिसळतील. एकमेकांच्या विषयांची मनाशीं तुलना करतील आणि मुख्य म्हणजे या संघटनामुळे एकाच्या व्यक्तित्वाचा दुसऱ्यावर परिणाम होत राहील. यांतूनच स्वच्छ नी शुद्ध विचार करण्याची सवय लागते, ही मनाची सवय म्हणजेच विद्यार्थ्यांची खरी संपत्ति. हल्लीचीं विद्यालयं म्हणजे मुलांचा नोकरवर्ग निर्माण करण्याचा कारखाना नी पालकांच्या पैशावर त्यांच्यांत बेजबाबदार वृत्ति उत्पन्न होण्याचं स्थान, दुसरं काय ?"

"नि मुलींच्या दृष्टीनं त्यांच्या लग्नाचा भाव वाढवण्याची युक्ति." विनायक मोठ्याने हसत म्हणाला.

"हास पाहिजे तर. पण मुलींना कांही मी वगळूं इच्छित नाही— मी म्हणतें तें मनाचं स्वास्थ्य मिळण्याऐवजी आम्ही मुली भावनेच्याच बाबतींत फाजील हळुवार बनून संसाराला

नालायक झालों आहोंत. नुसत्या पोषाखी नी वावदूक " ती हसत म्हणाली.

" पोषाखी हें मात्र खरं अं अक्का. ज्याला हल्ली एकदम श्रीमंत व्हायचं असेल त्यानं एखादं वनितावस्त्रभांडार उघडावं. महिन्यांत लक्षाधीश."

यावर सर्वच मोठयाने हसले. थोडया वेळाने श्रीनिवासने विचारलें " आपल्या कॉलेजांतून निरनिराळ्या विषयांचीं मंडळं असतात, संमेलनंही भरतात; त्यामुळे नाही का एके ठिकाणीं सर्व मोकळ्या मनाने जमत ? "

" संमेलन ! " उपरोधिक हसून विनायक म्हणाला.

" का ? हसायला काय झालं ? "

" माहिती आहेत तीं संमेलनं. मुलींच्या पुढे पुढे करण्यांत मुलांची स्पर्धा नी नुसतं झकास पोषाखांत नटून उगीच किलबिल करीत इकडे तिकडे मिरवण्याची मुलींची स्वाभाविक हौस. यापेक्षा भरीव त्यांत काय असतं रे ? "

" किती रे दादा टवाळी करतोस ? मी म्हणतें मंडळं असतात, पण एका मंडळाचं दुसऱ्या मंडळाला उभ्या वर्षांतून दर्शन तरी घडतं कां ? प्रत्येकाचा सवतासुभा. अन् प्राध्यापकांचं व्यक्तित्व—जाऊं द्या. "

ती एकदम थांबली.

" कां हो थांबलांत ? मला वाटतं लेख लिहून तुमचे हे विचार प्रसिद्ध कां नाही करू ? "

" म्हणजे झालंच. "

" झालं काय ? "

"एक तर सगळे साहित्यिक नी तज्ञ म्हणतील की मी वाङ्मय-चौर्य केलं. मनाला पटलेल्या गोष्टी मी मांडल्या असं असलं तरी

म्हणतील. आता हेंच पहा, मी मन:स्वास्थ्याविषयी बोललें ना? तेंच जर मी लिहून काढलं तर न्यूमनचे विचार मी चोरले असं म्हणतील. जसं कांही हे विचार त्यानं स्वतःचे नवीन म्हणून मांडले व त्यापूर्वी तसं कोणी लिहिलंच नसेल."

"म्हणेनात कां? तुम्ही लिहाच."

"पण खरं म्हणजे इतकी कुठं आहे स्वतःची लायकी? अगोदर म्हणजे हे नुसते मनांत तरंगणारे विचार आहेत. स्वतःच्या जीवनांत माणसानं ते अगोदर उतरवले पाहिजेत. खऱ्याखोट्याचा अनुभव घेतला पाहिजे ना? मग कदाचित लायकी येईल." एकदम गंभीर होऊन ती खाली पहात बसली.

एकंदर वातावरण एक प्रकारच्या गांभीर्याने भारून गेल्यासारखें झालें. विनायकाने तपकीर बोटांत धरली. श्रीनिवास सुन्न होऊन बसला. स्वतःचे विचारतरंग ओघांत पण अनपेक्षितपणे बोलावे लागल्यामुळे कालिंदी संकोचाने नी लाजेने चूर होऊन गेली. श्रीनिवासने शेवटीं शांततेचा भंग केला.

"तुम्ही फार कमी बोलतां असें विनू उगीच म्हणतो बरं का!"

"पुन्हा चूक केलीस. कमी बोलत नाही. जरूर तेव्हा नी योग्य वेळीं बोलायचं टाळीत नाही असं माझं म्हणणं. सांग, तूंच आता विषय काढलास तेव्हा मी आपला curiosity नी interest यांमधला भेद शब्दकोशांत पाहण्याच्या विचारांत होतों. अशा वेळीं तिनं बोलायचं टाळलं असतं तर तुझी अवहेलना नसती कां झाली?"

"Curiosity नी interest?" श्रीनिवास पुटपुटला.

"हें रे काय दादा उगीच! यांचं गाणं तसंच राहिलं ना? खरं म्हणजे तोच आताचा मुख्य कार्यक्रम होता. बाहेर बघ कसं छान चांदणं पडलं आहे. चला तुळशीवृंदावनाजवळ बसूं नी गाणं ऐकू." ती एकदम उठली. वातावरणांत तिने केलेला हा फरक

श्रीनिवासलाही आवडला. तोही तिच्याबरोबर उठला. अर्थात् विनायकही त्यांना साथीदार झालाच.

तिघेही बाहेर आले. कालिंदीने वृंदावनाकडे नजर टाकली. आंत जाऊन दुसरी वात नी तूप निरांजनांत घातलें. निरांजनाचा स्निग्ध प्रकाश चोहोंकडे पसरला, त्याबरोबर सर्वांच्या वृत्ति प्रफुल्लित झाल्या. ' माझ्याशीं थोडं हितगुज करा ' असंच जणूं काय भोवतालचें वातावरण त्यांना म्हणत होतें. म्हणूनच वृंदावनाजवळ बसल्यावर तिघेही जण कांही वेळ अगदी स्तब्ध होते.

"करा ना सुरवात." अखेरीस कालिंदीने विनंती केली.

"पण म्हणूं कोणचं ! सिनेमांतल्या गीतांशिवाय मला दुसरं येतच नाही."

"आपल्याला येतं तेंच म्हणण्यांत मजा आहे. खरं की नाही दादा ?"

"पण या वेळीं कोणतं म्हणावं तेंच तर सुचत नाही."

"तुम्ही ' हमराही ' पाहिलं आहेत ?"

"हो तर ! बरं सुचवलंत."

' हसी चांदकी आज निराली ' हें गाणें म्हणायला त्याने सुरवात केली. गाणें चालू होतें तोंपर्यंत तें खरोखरच श्रवणमधुर होतें. पण तें संपल्यावर मात्र भोवतालच्या सृष्टीने आपला प्रभाव त्यावर चालवला. आणखी आग्रह झाल्यामुळे त्याने दोन तीन गाणीं म्हटलीं. पण संकोच नाहीसा झाला होता, तरी वरील परिणामांत कांही फरक झाला नाही.

" तूं म्हण ना एखादं आता अक्का. "

" खरंच म्हणाना हो. "

" वाऽ म्हणजे रात्रीच्याच गाडीनं तुम्ही पळून जाल की. "

" काल सकाळीं ऐकलं आहे थोडं, एवढं लक्षांत ठेवा. "

" वरं म्हणतें, पण एकच हं."

"कबूल." दोघांनीही एकदमच आश्वासन दिलें. तिने सुरवात केली म्हणायला. तें कवि 'मिलिंद-माधवां'चें एक काव्य होतें.

'चल पुढें सारखा थांबुं नकोरे कधीं कुणासाठीं
परमाणूंतुनि मंत्रघोष हा निघे तुझ्यासाठी
दैवी दैवत दुनियेची हीं भरलीं रे कोठारें
उचल त्यांतला वाटा अपुला उघडुनिया दारें
आशेच्या आकाशीं अगणित सुखदु:खांचे वारे
प्रेमाच्या सृष्टींत उफाळे तुफान वादळ वारे
काय असें हें ! कशासाठि हें ? किंवा कोणासाठी ? '
जबाब त्याचा एकच साचा ' जीवन जगण्यासाठी.'

निरांजनाचा मंद प्रकाश तिच्या तोंडावर होता. तिचा गळा श्रीनिवास इतका गोड खास नव्हता; पण तिचा स्पष्टोच्चार, शब्दांची अर्थपूर्ण फेक, त्यांच्या उच्चारांत भावनाकुल स्वरांचा आलेला स्वाभाविक लवचीकपणा नी मुख्य म्हणजे तिच्या नेत्रांत ओतप्रोत भरून दिसणारी तिच्या स्वभावांतली तन्मय वृत्ति व काव्यांतील भावना ऐकणाऱ्यांच्या अंतःकरणांत सरळ सरळ शिरून त्यांना गहिवर आणीत होती. भोवतालच्या सृष्टीचें वातावरण दोघेही जण क्षणभर विसरले. कालिंदीही स्वतःचें भान विसरून खाली पहात पदराशीं चाळा करीत होती. श्रीनिवासनेही गाणें संपताच एक आवंढा गिळला व 'छान' एवढेंच म्हणून तोही खाली पहात राहिला. मूळचा आवाज जरी उत्तम नसला तरी हृदयाचा प्रामाणिकपणा, वृत्तीची तन्मयता नी म्हणण्याची अर्थपूर्ण ऐट यामुळे गाण्याचा किती व कसा परिणाम होतो हें त्याला सहजासहजी दिसून आलें.

"आता कप कप कॉफी घेऊं या का ?" कालिंदींतील गृहिणी एकदम जागृत झाली.

" कशाला त्रास घेतां उगीच ! " श्रीनिवासचा आवाज भक्ति नी आदर यांनी किंचित कंपित झाला.

" वा तुम्हांला एवढे गाण्याचे कष्ट दिले, त्याचं बक्षीस नको' कां द्यायला ?" निर्व्याज लाडीकपणें हसत ती उठून आंत गेली.

एक शब्द न बोलतां दोघेही तेथेच बसून राहिले.

थोडया वेळाने कालिंदीने कॉफी आणली. स्वतःच्या अंतरंगाशीं खेळत तिघेही ती प्याले व मुकाटयाने उठून आपापल्या अंथरुणावर जाऊन पडले.

—१०—

"आज आतां जायला परवानगी आहे का डॉक्टरांची ?"

दुसरे दिवशीं चहाच्या वेळीं श्रीनिवासने विचारलें. त्याचा चेहेरा उतरलेला होता. कां कोणास ठाऊक, पण रात्रीच्या चर्चेनंतर विशेषत: रात्रीच्या गाण्याच्या कार्यक्रमानंतर त्याला झोप आली नाही. आपलें अंतरंग आमूलाग्र हादरलें आहे एवढें त्याला कळून चुकलें.

" एवढी घाई कां ? अद्याप बरं वाटत आहेसं दिसत नाही चेहेऱ्यावरून. मग रहाना दोन दिवस. "

" तसं बरं आहे. पण राहिलेले सुटीचे दिवस घरीं नको का घालवायला ? " त्याच्या स्वरांत किंचित कारुण्य दिसतं होतें.

" अग, खरं म्हणजे तुझ्या पाहुणचाराला कंटाळला आहे, नी आपल्या आईकडे केव्हा जाईन असं झालं आहे त्याला. " विनायक म्हणाला.

" खरं का हो ? "

" याचं उत्तर खरोखरीच द्यायला हवं कां ? " गंभीरपणे तो म्हणाला.

" छे तसं कांही नाही. घरीं जायला पाहिजे हें खरं. मी नको थोडंच म्हणतें आहे. " त्याच्या चेहेऱ्याकडे पाहून ती

शांतपणें म्हणाली. तिने जा म्हटलें म्हणून आपल्याला जास्त अस्वस्थ कां वाटावें हें श्रीनिवासला कळेना.

"आता बाराची गाडी आहे. मी सुद्धा त्याच गाडीने जाणार बरं का अक्का." एकीकडे त्याच्याकडे पहात नी एकीकडे विचार करीत विनायक म्हणाला.

"म्हणजे?" स्तंभित होऊन कालिंदीने विचारलें.

"तिकडे बागायतीची इतकी अव्यवस्था झाली आहे म्हणतेस! सुटींत जर नीटनेटकं केलं नाही तर नुकसान होईल बघ फार."

"होऊं दे. मी देईन भरून. रात्रीं बसून दोघांनी कट केलाय की काय?"

"छे. हा जाणार हें या क्षणापर्यंत मला माहीत नव्हतं." श्रीनिवासने एकदम प्रतिकार केला.

"झालं तर. बाबा नी मुलें आल्याशिवाय तूं जाणार? खरंच त्यांची नी तुमची ओळख झाली असती राहिलां असतात तर." श्रीनिवासकडे पाहून ती म्हणाली.

"मलाही बरं वाटलं असतं. पण आता घरीं गेलंच पाहिजे हें खरं."

"ती मंडळी केव्हा येणार हें निश्चित नाही. एरव्ही रहा म्हणतेस तर रहात नाही का मी अक्का?"

त्याने असा कांही प्रामाणिकपणाचा आव आणला की कालिंदी बिचारी थंड झाली. तिने आणखी थोडा आग्रह करून पाहिला, पण अखेरीस तिला जाण्याकरतां त्याला संमति द्यावी लागली.

जेवणं अर्थात गडबडीनें झालीं, तरी वाटीवाटी सुधारस तिने त्यांना खायला घातलाच. बरोबर फराळाचें करून दिलें. श्रीनिवासने आपलें सामान टांग्यांत ठेवण्याकरतां बाहेर आणलें तर त्याला त्या-बरोबर एक पिशवी दिसली.

"हें हो काय ?"

"वाल."

" ते कशाला ? "

" तुम्हांला फार आवडतात म्हणे. काल घातले होते भिजत पण सकाळला कुठले मोड यायला. इथे चांगले मिळतात म्हणून बरोबर दिले. तुमची आई म्हणे याची उसळ छान करते. "

" तुम्हांला कुणी सांगितलं हें सगळं ? "

" सांगितलं असंच एका कर्णपिशाच्चानं " तिने विनायका-कडे नजर टाकली.

" यानं होय ? तुला रे काय माहीत ? मी तर बोलल्याचं आठवत नाही. "

" प्रत्यक्ष नाही. पण अप्रत्यक्षपणें तूं किती तरी गोष्टी बोलतोस. त्यांपैकीच हीही एक. " विनायक मोठयाने हसला. श्रीनिवासने एकदा आभारदर्शक दृष्टीने पाहिलें व मुकाटयाने पिशवी घेऊन तो टांग्यांत जाऊन बसला. त्यांना निरोप देण्याकरतां ती स्टेशनवर गेली होती.

—११—

" प्रिय दादा,

तुझं पत्र मिळालं. तुझ्या मित्राचंही पोचल्याचं पत्र आलं आहे. पाहुणचाराबद्दल आभार मानले आहेत. अक्षर अगदी पोषाखाप्रमाणं म्हणजे सुरेख आहे. तूं विचारतोस त्यांच्या-विषयी माझं 'इंप्रेशन' काय झालं ? चांगले कपडे, स्वच्छता, नीटनेटकेपणा यांची माणसाला आवड असावी. पण काय रे दादा, ती एक अगदी मनोविकृति दिसेपर्यंत का माणसानं वागायचं असतं ? त्यांतच जर दिवसाचे कांही तास खर्च होऊं लागले तर मग मुख्य उद्योग करायचा तरी केव्हा ? स्वच्छतेंत जरा कुठं बिघडलं तर ही स्वारी उद्या लग्न झालं

की बायकोचा बीव नकोसा करील. नाही तर स्वच्छंदतेत त्यांच्यावरही ताण करणारी छोकरी पाहून दे त्यांना म्हणजे बरं होईल शेरास सव्वाशेर. तें जाऊं दे. पण गंभीर विषयावर स्वतःची स्वतंत्र बुद्धि कांही चालवतातसे दिसत नाहीत. वर्गात प्रोफेसर्स सांगतात त्या व स्वतः श्रमाने मिळवलेल्या नुसत्या माहितीवरच फर्स्ट क्लास मिळवतातसं दिसतं. श्रम करण्याची तयारी नी फर्स्ट क्लास याचं कौतुक अवश्य केलं पाहिजे. पण एवढयानंच जीवन यशस्वी रीतीनं जगतां येतं का ? हाच प्रश्न मलाही नेहमी पडतो. फर्स्टक्लासची महत्वाकाक्षा जरूर असावी, पण जीवन जगण्याची कला शिकण्याची महत्वाकाक्षाही बरोबरीनं असावी. कसं वाटतं तुला ! बरं, त्या दिवशीं 'जबाब' पाहून येत असतांना नटनटींची यादी नी गाणीं, यावरच सारखे कायरे रेंगाळले ते ? चांगला चित्रपट म्हणजे चांगल्या नटी नी चांगलीं गाणीं, एवढंच का ? मला वाटलं, भिन्न परिस्थितींल्या दोन स्त्रिया, ज्या, जरा डोकं ठिकाणावर नसलेल्या माणसावर इतकं प्रेम करूं शकतात त्यांच्या व्यक्तित्वाबद्दल हे कांही तरी बोलतील. माणसाला माणसाबद्दल जें कुतूहल वाटत असतं तेंच जीवनांतलं अमर सत्य असं वाटतं बाई मला. मग तुझ्या मित्राचं असं का ? बाकी त्यांच्यांत आत्मकेंद्रित वृत्ति दिसत नाही हो ! नी गातातही छान. तसा मनुष्य सहृदय दिसतो. जाऊं दे. बाकी तूं मात्र दादा, या खेपेस मुळी मुळी राहिला नाहीस. अगदी वाइट्ट आहेस. मला वाटलं की माझ्याप्रमाणं तुलाही तुळशीवृंदावनाजवळ रात्रभर बसून माझ्याशीं गप्पा माराव्याशा वाटतात. रागावूं नकोस हो असं म्हटल्यावर ! पण खरंच अशा कितीतरी गप्पा आपण केल्यात नाही ? आठवतं मला. तरी तुला मी वर दोष दिला. तूं एकदम गेलास नी नेहेमी मिळणारं असं कांही तरी मिळायचं राहिलं. असं का विचारशील ? सांगतेंच झालं. एकातात माझ्या स्वतःचं मी निरीक्षण करतें तेव्हा वाटतं

मी जगाला खूप देतें. अगदी स्वतःला विसरून-जगाशीं तद्रूप होऊन देतें. दिल्याशिवाय राहवत नाही म्हणून देतें. मला कृतघ्न व्हायचं नाही. माझ्या भोवतालचं जग आपल्या परीनं मला उलट देतं. नाही-असं नाही. पण ज्या पातळीवरून मला तें हवं असतं त्याची जाणीव जगाच्या लक्षांतच येत नाही. परिणाम काय ! मी जगाविषयी कृतज्ञ असतें पण पुष्कळदा मी अगदी एकटी-एकटी आहे असं वाटतं. जगांत असून जगापासून वेगळी-एकटी. असह्य होतो हा एकटेपणा केव्हा तरी-पण दुसऱ्याला नेहमी प्रसन्न चेहेरा दाखविण्याची कला देवानं जन्मजात दिली आहेना ? मला कधी कधी वाटतं माझं खरं जीवन म्हणजे मानसिक जीवन—कसली विचित्र बाई जन्माला आलेंय मी ! म्हणून म्हणतें तूं एकदम गेलास नी कसं चुकल्यासारखं वाटलं मला. ज्या पातळीवरून मला आनंद हवा असतो, तसा तूं नेमका नी सहज देतोस—देतांना तुला प्रयत्न करावा लागतोय असं एकदाही दिसलं नाही. केव्हा केव्हा वाटतं की तूं लग्नच करूं नयेस. ती वहिनी बळकावून बसेल तुला अशी भीति वाटते ना ! बाकी तुला योग्य अशी एखादी छोकरी शोधून काढण्याचा मला अलीकडे नाद लागला आहे. का विचारशील ? मला वहिनीची हौस आहे ना ! आता तूं मनांत नक्की म्हणशील की "Woman is a bundle of contradictions" ( स्त्री म्हणजे परस्पर विरोधी गोष्टींचें एक गाठोडें आहे ) मी म्हणतें, हो, आहोंत आम्ही तशा नी तशाच रहाणार. पण यांतच तुम्हां पुरुषांना आकर्षण आहे नी आमची मुक्ति आहे. कळलं ! नसेल कळत तर घे एक चमचाभर तपकीर नी कर डोकं साफ. इश्श ती तपकीर रे कशाला मागे लावून घेतलीस ! बरं, आता पुरे-लौकर नी चांगलं मोठ्ठं पत्र पाठव माझ्याशीं खूप बोललास असं वाटलं पाहिजे मला पत्र वाचून. तुझी भेट झाली नाही म्हणून इथे सर्वांनाच वाईट वाटलं. बाबा जुन्या

कागदपत्रांत डोकं खुपसून बसलेत. माणिक नी दिनू तुझ्यावर खूप रागावली आहेत.

तुझी—अक्का"

यावर बरेच दिवसांनी तिला विनायकाचें पत्र आलें तें असें.

" प्रिय अक्का,

तुझ्या पत्राला उशीरा उत्तर देतों आहे म्हणून चिडूं नकोस. मी जरा गडबडींत होतों. श्रीनिवास येथून नुकताच घरीं गेला. जाण्यापूर्वी त्यानं तुझ्याबद्दल माझेजवळ मागणी घातली व त्याच्याविषयीं तुझं काय मत झालं तेंहि विचारलं. मी त्याला तुझं पत्रच वाचायला दिलं. तें वाचल्यावर तो अतिशय गंभीर झाला. एक शब्द बोलला नाही. नंतर तो घरीं गेला व त्यानं मला एक पत्र पाठवलं. तें यासोबत पाठवीत आहे. वाच. वाचल्यावर त्याला केराची टोपली दाखवावीशी वाटली का तेवढं मात्र कळव.

तुझा—दादा"

" ता. क. मी एकदम गेल्यामुळं तुला चुकल्या चुकल्या सारखं वाटलं वगैरे जें कांही लिहिलें आहेस त्याबद्दल न विसरतां मी पुढील पत्रांत तुला लिहिणार आहे, एवंढ नीट लक्षांत ठेव."

श्रीनिवासचं पत्र

"मित्रवर्य विनायक यांस सप्रेम न. वि. वि.

तुझ्या अक्काला मी मागणी घातली ही चूक झाली. तिचं पत्र वाचल्यावर मी खूप विचार केला; स्वतःबद्दल नी तिच्या घरीं घडलेल्या एकेक घटनेबद्दल. मी पुरुष आहे. तेव्हा प्रथम तिचा राग आला हे कबूल करतों. पण स्वतःचं नीटपणें निरीक्षण केल्यावर खरंच वाटायला लागतं की मी तिला लायक नाही. गांभीर्य आणि विनोद यांचं हृदयंगम

मिश्रण तिच्यांत आहे. आपल्या सहवासांतल्या माणसांना बुद्धीनं, भावनेनं, चातुर्यानं नी सर्वांत महत्वाचं म्हणजे संयमानं सदा प्रसन्न ठेवायची हातोटी (ability to please) तिच्यांत स्वभावसिद्ध आहे. जाऊं दे. तुझ्या 'अक्काला' विसरायला मला आता किती दिवस लागतील तें मला केंव्हाही विचारायचं नाही एवढी माझ्यावर दया कर. संपला तो विषय. पण विषय संपण्यापूर्वी तिला योग्य असा पति तिला मिळो अशी प्रार्थना देवाजवळ करावीशी वाटली नी मी ती केली.

तुझा—श्रीनिवास"

आठ दिवसांनी कालिंदीचें विनायकाला उत्तर गेलें.

"दादा,

शर्थ झाली बाई तुझी. माझं पत्र तूं त्यांना दाखवलंस ? आता म्हणावं काय तुला ? मला अगोदर विचारायचं तरी होतंस ? मनात येईल तें तुला मी लिहितें. ते माझ्याविषयीं काय कल्पना करून घेतील ? मी नुसती माझी impressions तुला सहज लिहिलीं. तेंहि तूं विचारलेंस म्हणून. लग्नाच्या दृष्टीनं कां मी विचार केला होता त्या वेळीं ? तूं खरा आहेस तरी कसा हेंच मुळी समजत नाही. तुझ्या मनाचा थाग ज्याला खरोखरीच लागेल त्याच्याशीं मी डोळे मिटून लग्न करीन. तो कसाही असो मग. बाकी एवढं खरं की श्रीनिवासाच्या पत्राला केराची टोपली मात्र मला दाखवावीशी वाटली नाही. कां ठाऊक आहे ? त्या पत्रानं मला गेले आठ दिवस विचारमग्न केलं. इतकंच नव्हे. त्यांत प्रगट झालेली त्यांच्या मनाची ठेवण मला चित्ताकर्षक वाटली. ज्या माणसाला आयुष्यांत एकदा तरी अंतर्मुख व्हावसं वाटतं—अगदी मनापासून वाटतं—तो मनुष्य माझ्या मतानं इतर हजार माणसांपेक्षा श्रेष्ठ. मनुष्याची खरी पारख रोजच्या सहज

घडणाऱ्या लहानसहान कृतीवरून होते म्हणतात. तुला ठाऊक नाही, त्या दिवशीं मोलकरीण नव्हती तर त्यांनी स्वतः आपलं धोतररुमाल धुवून ठेवलं नी तेंही अगदी गुपचुप. अशा आणखीही गोष्टी आठवतात. लहान मोठया पुष्कळ माणसांचा सहवास आयुष्यांत आपल्याला येतो. पण सहवासांतल्या माणसाविषयीं जाणीव ठेऊन अकृत्रिम सहजतेनं नी दुसऱ्याची जाणीव ठेवून वागणारीं माणसं किती थोडी आयुष्यांत भेटतात ? या गोष्टी तुला नाही कळायच्या. त्यासाठी बायकांचा जन्म घ्यावा लागेल तुला. टिंगल करणार नसशील तर सांगतें. त्या दिवशीं ते म्हणाले, "आज आता जायला परवानगी आहे कां डॉक्टरांची ?" आठवतं ? त्या वेळीं वाटलं, नाही जाऊं देऊं यांना. अगदी मनापासून वाटलं—असो; हें लिहीत असतांना त्यांचं पत्र डोळ्यासमोर येतं. माझा काल्पनिक नकार किती मुकाटयानं त्यांनी त्यांत मान्य केला आहे. त्यांत कोणावर आरोप नाही—कसलीही तक्रार नाही–कसलाही कडवटपणा नाही. अशा तऱ्हेने नकार मान्य करायलाही एक प्रकारचं धैर्य असावं लागतं माणसांत. खरं ना ? त्या पत्रांतले शब्द मला आठवत नाहीत. लिहितांनाची मनोवृत्तीच फक्त दिसते आहे. हें पहा दादा, मला वाटतं त्यांना हो म्हणावं. त्यांच्याविषयीं दया वाटून मी हो म्हणतें किंवा त्या पत्रांतील माझ्याविषयींच्या स्तुतीला बळी पडून मी असं म्हणतें इत्यादि विचार निदान तुझ्या तरी मनांत येणार नाहीत असं वाटतं. दया दाखवून दुसऱ्याचा अपमान करण्याइतकी मी हलकट नाही, एवढं मला माझ्याविषयीं कळतं. मला हो म्हणावंसं वाटतं हें खरं. पण तुझी-ही संमति असेल तर हो. स्वतः 'हो' म्हणून लगेच मी अशी नर्व्हस झालें म्हणून तूं थट्टा करशील. पण विचार कर, आपल्याला जुळेल असा पति निवडून काढणं आम्हा मुलींना किती कठीण झालं आहे, हें तुला कसं सांगूं ? कॉलेज जीवनांतच फक्त कशाला, हल्लीच्या सामाजिक जीवनांतच

एकंदरींत म्हणेनास, आमच्या भोंवती मनाला चटकन भुरळ पाडणारीं इतकीं विविध आकर्षणं असतात की त्यांतून अस्सल नी खरं मनुष्य शोधून काढणं कठीण होऊन बसलं आहे. माझ्या एका मैत्रिणीला एका मारवाडी ब्राह्मण विद्यार्थ्याविषयीं आकर्षण वाटूं लागलं. तो इतका स्वच्छ पोषाख करायचा ! नी मराठी तरी इतकं छान बोलायचा–खूप श्रीमंत. एकदा मी तिच्याबरोबर त्याच्या घरीं गेलें. दिवाणखाना अगदी अद्यावत पद्धतीनं सजवला होता. वाटलं शिक्षणामुळं सर्व जाती अगदी एका पातळीवर आल्या आहेत. पण आंत गेल्यावर त्याला घरांतील मंडळींत वागतांना–बोलतांना पाहिलं नी खात्री झाली की आम्ही एका पातळीवर आलों आहोंत तें पाश्चात्यांच्या केवळ बाह्य स्वरूपापुरतें. आंतून जसे होतों तसेच आहोंत. मारवाड्यांचा हिशोबी स्वभाव नी त्यापासून निघणाऱ्या सर्व अप्रिय गोष्टी जशाच्या तशाच. माझ्या मैत्रिणीला वाटणारं आकर्षण क्षणांत विरघळलं. एकदा एका मुलानं मला मागणी घातली. त्याचं बोलणं इतकं गोड, सहज बोलतांनाही इतके उदात्त विचार सांगायचा, की कोणालाही आकर्षण वाटावं. दैवयोगानं त्याचं खाजगी जीवन एकाएकी प्रगट झालं. इतका विरस झाला. वाटलं देवानंच वाचवलं आम्हां मुलींना. किती उदाहरणं देऊं ? हें असं चाललंय. जें मुलींचें तेंच मुलांचंही. कांही अपवाद सोडले तर आमच्या कॉलेजांतल्या मुली !—जाऊं दे. मला निंदा करायची नाही. हा एक मुलामुलींचा problem झाला आहे, एवढंच सुचवायचं आहे मला. पण हें वडील माणसांनी ओळखायला नको कां ? एक पाठवतो म्हणून दुसराही आपल्या मुलीला बेलाशक पाठवतो कॉलेजांत; नी मग कांही प्रश्न ( म्हणजे पालकांच्या मतें ) निर्माण झाले की एकेका पालकांची वृत्ति अशी नमुनेदार दिसून येते पण ! एखादा बाप ' मुलीनं तोंडाला काळं फासलं ' ' नाही तर कारट्यांनं आज्ञाभंग केला ' अशी ओरड करून

सर्व घराला आग लावीत सुटतो. कांही जण तर 'आपलीं मुलं त्या 'योजलेल्या विवाहानं' खरोखरीच सुखी होतील का?' याचा यत्किंचितही विचार न करतां 'बरं झालं अनायासें जबाबदारी गेली' असं म्हणून आनंदाचा श्वास सोडीत मुलांच्या डोकीवर अक्षता टाकतात नी मोकळे होतात. मला वाटतं एकीकडे मुलाचं नांव कॉलेजात घालायचं नी घरीं येतांच चांदीच्या वाटींत अक्षत तयार करायची, असंही होत असावं. कांही जण 'अहो हा शिंचा काळच खराब आला आहे' म्हणून काळ, समाज, मुलं, सर्वांना ऊर बडवून नुसत्या शिव्या देतात. काळ आला आहे खरा, पण त्याला योग्य ती कलाटणी देऊन समोर उभे राहिलेले प्रश्न धैर्यानं सोडवायचं सुचतं का कोणाला? 'काळ आला आहे' हें दिसत असता आमच्या स्वभावाची योग्य अशी पार्श्वभूमि तयार करुन मग सोडाना आम्हाला त्या कालचक्रात! आलेल्या काळाला एक तुम्ही तरी धैर्यानं तोंड द्या नाही तर आमच्यावर तरी जबाबदारी विश्वासू मनानं टाका. पण चाललं आहे काय? नुसती धरसोड. प्रवाहाबरोबर चिडचिडून वहात जाणं. जाऊं दे–कांही तरीच भरकटत चाललें आहे लिहितांना. पुन्हा मूळपदावर येऊन सांगतें की मी हो म्हणतेय पण तूं संमति देत असशील तर. पण श्रीनिवासला होकार देण्यापूर्वी बाबांना विचार हो. त्यांनी मला पूर्ण स्वातंत्र्य दिलं आहे. म्हणूनच माझी अशी श्रद्धा आहे की त्यांच्या आशीर्वादाशिवाय मी सुखी होणार नाही.

तुझी—**अक्का**"

यावर तिला विनायकाचें उत्तर उलटटपालीं आलें

"प्रिय् अक्का,

अग, मी नुसतं 'हो' म्हणत नाही आता. त्याची माझी ओळख झाल्यानंतर तूं म्हणतेस त्याप्रमाणं अगदी लहानसहान

रोजच्या गोष्टींत त्याचे गुण मला दिसूं लागले. वाटूं लागलं की ही स्वच्छतेची फाजील आवड वगैरे गोष्टी वरवरच्या आहेत. आंतील मनुष्य निराळा आहे. त्याच वेळीं मनांत ठरवलं 'हा माझ्या अक्काचा पति.' यापूर्वीच मीं त्याला तुझ्याकडे आणणार होतों. पण प्रेमाताई व त्याची वाढती मैत्री व आकर्षण माझ्या नजरेस यायला लागलं. तेव्हा तिच्या घरचं वातावरण कसं आहे, दिवसाच्या चोवीस तासांत भोवतालच्या जगाशीं तिचं वागणं कशा प्रकारचं आहे, याचं त्याला प्रत्यक्ष दर्शन करून द्यावं नी त्यानंतरही जर दोघांचं खरोखरीच अचल प्रेम आहे असं दिसलं तर मग चूप बसावं असा बेत केला. पण हा बेत अमलांत कसा आणायचा याचा विचार पडला होता तोंच परमेश्वरानंच पुढच्या सर्व घटना घडवून आणल्या नी ज्याचं माणूस त्याच्या स्वाधीन केलं."

यानंतर सुरवातीच्या दोन पत्रांपासून तों कालिंदीच्या घरीं येईतोंपर्यंतची सर्व हकीकत त्यानं तपशीलवर निवेदन केली व पुढे लिहिलं:—

"अक्का, हा तुझा पति असं मी मनांत म्हणत होतों खरा, पण तेंच मन कांही क्षण साशंक होई. वाटे की दिवसाच्या चोवीस तासांतल्या परस्परविरोधी घटनांतून सहीसलामत टिकून जें आकर्षण परस्परांविषयीं श्रद्धा कायम ठेवतं तेंच खरं आकर्षण, तेंच खरं वैवाहिक जीवन. हा फर्स्ट क्लास फर्स्ट. त्यांतून पुरुष म्हणून नैसर्गिक 'मीपणा' कदाचित् वरच्या श्रेणीचा अंगीं दिसून पडायचा. तुझ्या घरीं आम्ही असतांना तुझ्या व्यक्तित्वाचे ठोसे ह्या 'मीपणावरं' आदळले तर कोणती प्रतिक्रिया निर्माण करतात त्याकडे माझं सारखं लक्ष होतं. कारण भलतीच प्रतिक्रिया झाली तर रोजच्या वैवाहिक जीवनांत तुम्ही एकमेकांपासून मनानं दूरदूरच होणार. पण अखेरीस एका प्रसंगानं खात्री झाली की सर्व ठीक होईल.

तुझं तें मनःस्वास्थ्यावरचं व्याख्यान मला नसलं तरी त्याला नवीनच होतं; तरी पण तें ऐकल्यावर 'तुम्ही लेखरूपानं हे विचार प्रसिद्ध कां नाही करीत ?' असं तो म्हणाला. आठवतं ? नी तेंही किती सरळ मनानं नी कौतुकानं ? दुसऱ्यांतलं श्रेष्ठत्व व नावीन्य स्वतःचा स्वाभाविक 'मीपणा' वर उसळूं न देतां कौतुकानं पहायचं हा त्याचा स्वभावच त्याच्या त्या वेळेच्या स्वरांत व चेहेऱ्यावर मला दिसला. नी खात्री पटायला लागली की हाच तुझा पति. पण— आता पुन्हा पण काय म्हणून विचारशील ? अग तुझ्या मनावर त्याच्या सहवासाचा काय परिणाम झाला तें राहिलंच होतं की बघायचं ! आजारीपणांत तूं त्याची सेवा केलीस व आदरातिथ्य चार दिवस खूप केलंस ? पण हें सर्व तुझ्या स्वभावाप्रमाणेंच होतं की त्यांत आणखी कांही 'विशेष' होतं तें नीटसं कळेना ! 'तूं गेलास नी कसं चुकल्यासारखं वाटलं' असंही तूं पहिल्या पत्रांत लिहिलंस—त्याचाच मी इकडे विचार करीत होतों. म्हणूनच या 'चुकल्यासारखं वाटतं' बद्दल मी तुला लिहिणार आहें असं कळवलं होतं तुला. मी लिहिण्यापूर्वी तूंच आता लिहितेस की 'त्या वेळीं वाटलं की नाही जाऊं देऊं यांना.' का वाटलं तुला असं ? हा प्रश्न ऐकून तूं एकदम खुदकन हसशील नी फोटो घेण्यालायक लाजशील. तें दृश्य पाहण्याचं माझ्या नशिबीं नाही याचंच मला वाईट वाटत आहे. असो, पण त्या एका वाक्यानं कळलं मला सगळं. समजलं पोरी ! हें झालं, पण एक मोठा प्रश्न पडला ! तूं स्वतः वेळींच जागी झालीस नी तपश्चर्येनं स्वतःचं अंतरंग भरीव करण्याच्या कामांत पाऊल बरंच पुढे टाकलंस. पण तो ! तो तुझ्या सहवासांत जागा होत होता. पण स्वतःची पूर्ण ओळख त्याला कुठं पटली होती ! म्हणजे आपल्याला काय पाहिजे-कोणतं मनुष्य पाहिजे-हें त्याला कुठं कळत होतं ? त्याकरतां त्याला अंतर्मुख होणं जरूर होतं. नी

तें कोणाच्या उपदेशानं का होणार होतं पोरी ! मला वाटलंच होतं की त्याच्याबद्दलचीं तुझीं impressions तुला विचारली म्हणजे 'तें मनोविकृति का काय तें,' नी 'जबाब प्रकरण' वगैरे तूं लिहिशील म्हणून. तसंच झालं. ज्या स्त्रीवर आपलं खरं प्रेम आहे तिनंच आपली हजेरी घेतलेली पाहून कोणत्या प्रेमी माणसाला धक्का बसणार नाही ? तुझं पत्रच त्याला वाचायला द्यावं नी हा धक्का द्यावा अशी युक्ति मला सुचली. खरं म्हणजे माझ्या तपकिरीच्या डबीनं मला सुचवली. ही त्याचीही कसोटीची वेळ होती. तुझ्या पत्रानं चिडून तो दुसऱ्या मुलीकडे धाव घेतो की काय, हेंही बघायचं होतं. तसं झालं नाही. 'तुझ्या अक्काला विसरायला मला आता किती दिवस लागतील तें विचारूं नकोस.' असं उलट त्यानं मला लिहिलं. त्याच्या प्रामाणिकपणाचा दुसरा एक नमुना पहा. प्रेमाताई-जवळ प्रेमाच्या आणाभाका जरी झाल्या नव्हत्या तरी आपल्या वागणुकीनं तिला आपण उत्तेजन दिलं आहे हें तो जाणून होता. म्हणून एकीकडे तुझ्याबद्दल जरी त्याचा जीव व्याकुळ होत होता तरी प्रेमा आता त्याला विसरत चालली आहे हें त्याला स्पष्ट दिसेपर्यंत त्यानं तुझ्याबद्दल मागणी घातली नाही. ही काय लहान गोष्ट आहे ? म्हणून म्हणतों अक्का, की हाच तुझा पति. 'इतकं सगळं चऱ्हाट लिहिण्याऐवजी एका वाक्यांत 'माझीही संमति आहे' असं कां नाही लिहिलंस ?' म्हणून विचारशील. उत्तर हेंच की परमेश्वरानं स्त्रियांना प्रत्यक्ष कसंही घडवलेलं असलं तरी 'आम्हांलाही परमेश्वरानं मेंदु दिला आहे' असं म्हणून तुम्ही मुली (म्हणजे शिकलेल्या) अलीकडे 'वाद-विवाद' घालीत असता. तेव्हा माझ्यावरील श्रद्धेवर अवलंबून रहा एवढंच तुला सांगून कसं भागलं असतं ! बुद्धीनं पटवून दिलं पाहिजे ना ? बाबाची संमतीच काय, पण जावयाची प्रत्यक्ष ओळख करून देण्याकरतां मी त्याच्या घरींच त्यांना घेऊन जाईन

अगोदर. त्याच्याकरतांही एक युक्ति सुचली आहे. श्रीनिवासच्या गावांत–म्हणजे गावाबाहेर–एका शेतांत देतों दोन दगड पुरून नी त्यावर आजपर्यंत कोणालाही अज्ञात अशा भाषेंत देतों चार अक्षरं कोरून. 'Aryan Conquest of the Deccan' या विषयावर मोठा (?) प्रकाश टाकणारे दोन शिलालेख सापडले आहेत अशी देतों त्यांना थाप नी घेऊन जातों त्यांना त्याच्या घरीं. अग, माझा मित्र म्हणजे कोकणचा हापूसचा अंबा आहे. नुसता रंग पाहूनच बाबा खूश होतील; नी मग त्याच्या सहवासाचा रस चाखायला मिळाला म्हणजे तर काय ? तोंपर्यंत तूं मात्र त्यांच्यासमोर अगदी निर्विकार रहा बरं का. नाहीतर हें पत्र वाचल्यानंतर लग्नाच्या विचारानं (नव्हे, स्त्रियांच्या बाबतींत, भावनेनं) अंतर्बाह्य व्यापली जाऊन उगीचच लाजशील नी मग त्या म्हाताऱ्याच्या अनुभवी डोळ्यांना तें दिसेल.' खोलींत एकटी असशील तेव्हा खुशाल day dreams चा अनुभव घे. हरकत नाही माझी. पण त्या स्वप्नांमध्ये स्वतःचंच कौतुक करीत बसूं नकोस, जरा तूंही आत्मनिरीक्षण कर. उगीचच मोलकरणीला घालवून देणं नी व्याख्यान देणं हे दोष तुझ्यांतही डोकावूं पहातात बरं का ? विचार कर. पत्नीच्या व्याख्यानांनी एखादा तरी पति ताळ्यावर आल्याचं उदाहरण आहे का ? तिच्या अबोल व्यक्तित्वाच्या प्रभावानंच तो आला तर ताळ्यावर येतो. ठेव माझं नांगऱ्याचं एवढं वाक्य लक्षांत. तूं विचारतेस 'दादा तूं खरा आहेस तरी कसा ?' काय करायचं आहे उत्तर देऊन ? जसा तुझा नांगऱ्या भाऊ आहे तसाच त्याचा स्वीकार कर. माझ्या तपकिरीच्या डबीवर कां ग एवढी घसरतेस ? या एकाकी प्राण्याला, दुःखाच्या, निराशेच्या क्षणीं तिनंच साथ दिली आहे म्हटलं. तूं म्हणशील की, 'दादा, मी आहे ना तुझी अक्का !' खरं आहे. पण कुठपर्यंत ? तुझ्या आयुष्यांत centre of interest निर्माण झाला नव्हता तोंपर्यंत. पण

आता ! ए पोरी, चिडूं नकोस. मनाप्रमाणे पति मिळून तूं सुखी झाली आहेस हें दुरून पाहण्याच्या आनंदांत खरोखरी सर्व नुकसानीची भरपाई आहे हें मी जाणतों. तरी तुझी इच्छा म्हणून मी तपकिरीची डबी दूर सारणार—म्हणजे फेकून नाही देणार-योग्य माणसाच्या स्वाधीन करणार आहे, अगदी अमोल ठेव म्हणून. आता पुरे. कांही लिहायचं राहिलं असल्यास समक्ष —म्हणजे लग्नापूर्वी (घाबरूं नकोस—लग्नानंतर नव्हे) बोलेन.

तुझा—विनूदादा

ता. क. तुझ्या त्या Residential University, मन:स्वास्थ्य वगैरे विषयांवरच्या व्याख्यानाला माझं एकच उत्तर. लग्नानंतर होईलच की तुमची तशी युनिव्हर्सिटी स्थापन; नी मग एकाच्या व्यक्तित्वाचा दुसऱ्यावर परिणाम.—सर्व कांही आहेच. मी मात्र पहिले कांही दिवस तरी तुमच्या युनिव्हर्सिटीला भेट देणार नाही. कारण माझा डोळा चुकवून रात्रीच्या चांदण्यांत दोघेजण तुळशी वृंदावनाजवळ बसाल नी स्वतःचं अलग व्यक्तित्व पार विसरून 'तुम्ही मला किती आवडतां'—'तूं मला किती आवडतेस!' वगैरे जें कांही भरमसाट असतंना, तेंच एकमेकांना घोळघोळून सांगत सुटाल. ही तुमची कधीही न संपणारी निरर्थक बडबड आहे. जीवन यापेक्षा जास्त विस्तृत नी तेजोमय आहे असं प्रत्यक्ष ब्रह्मदेवानं जरी त्या वेळीं तुम्हांला येऊन सांगितलं तरी तुम्ही थोडेच ऐकणार आहांत ? फक्त माझ्याकरतां एक 'छान छोकरी' की काय ती शोधून काढायची तूं प्रतिज्ञा केली आहेसना ? त्याची मधूनमधून आठवण ठेवायचा प्रयत्न कर बरं कां अक्का! तोंपर्यंत मी माझ्या बागेंत एक झकास तुळशीवृंदावन तयार करून ठेवतों.

तुझा—नांगऱ्या दादा"

—१२—

पुढे कांही दिवसांनी एका शुभमुहूर्तावर श्रीनिवास कालिंदी-च्या विवाह झाला. लग्नांत मुख्य करवली म्हणून प्रेमाताई इकडे तिकडे नाचत होतीच. या नवऱ्या मुलाच्या प्रेमपाशांत आपण कायमचं अडकण्याच्या बेतात होतों याची तिला जाणीवही दिसत नव्हती. स्वभावाचा महिमा. दुसरं काय? विनायक मात्र तिला विसरला नाही. एका फॅशनेबल, श्रीमंत पण सुस्वभावी तरुणाशीं त्यानं तिचा वाङ्निश्चय करून टाकला. नंतर तिला आपल्या अक्काच्या लग्नाला आणली. लग्नांतली देणगी म्हणून प्रेमाला त्यानं दोन अद्यावत् फॅशनचीं पातळें दिलीं. नी वधूवराला अहेर! श्रीनिवासच्या हातीं स्वतःची तपकिरीची डबी आणि कालिंदीच्या हातीं वांगी नी वाल यांनी भरलेली रेशमी पिशवी. असला अपूर्व अहेर पाहून दोघांनी एकदमच विचारलं "हें रे काय?"

"अग, हा तुझ्या मुठींत सतत रहावा असं जर तुला वाटत असेल, तर भरलीं वांगीं नी वालाची उसळ, रोज याला खायला घालीत जा. नी ही 'माझी अक्का' कशी आहे हें जर तुला समजून घ्यायचं असेल तर मधूनमधून चिमूटभर—नव्हे चमचाभर तपकीर नाकांत ठोशीत जा." असं म्हणून, डोळ्यांत उभे राहिलेले (मग ते प्रेमाचे, आपली अक्का दुसऱ्याची झाली म्हणून वाटणाऱ्या वियोगाचे की कशाचे?—तें सांगतां येणं कठीण आहे.) अश्रु लपवीत विनायक तेथून पळाला. दोघांनीही तें पाहिलं. नंतर एक-मेकांकडे पाहिलं नी मनांतल्या मनांत काय तें समजून दोघेही त्याच्या शोधार्थ धावले.

समाप्त